# ज्ञानदेवा चीं भजनें

## चिंतनिके सह



**विनोबा**

‘धर्‌म जागो निवृत्‌ती चा हरि-नामें उत्‌सावो’

—ज्ञानदेव

ग्‌राम-सेवा-मंडळ, वर्‌धा

आ. २ री ]  १९४७  [ किं० १॥ रु.

# दुसऱ्या आवृत्ती ची प्रस्तावना

ज्ञानदेवा च्या भजनां च्या या दुसऱ्या आवृत्ती त पद्य-संख्या आणि रचना पूर्वी प्रमाणे च ठेवली आहे। पूर्वी चें ६३ वें पद्य काढून त्या जागीं नवीन पद्य घातलें आहे। अेक-दोन पद्यें संक्षेपिलीं आहेत। कांही संशोधिलीं आहेत। संशोधना ला अजून अवकाश नाही असें नाही, पण सध्या अितकें च शक्य झालें आहे।

ज्ञानदेवा चीं कांही भजनें गूढ वाटण्या सारखीं आहेत। ज्यां त अंतिम अनुभवा चें वर्णन आहे त्यां ची भाषा तर त्रुटित च आहे। या त आश्चर्य नाही। जो अनुभव शब्दां त मावणारा च नाही, तो मोडक्या भाषे त कां होओी ना मांडला गेला हें च विशेष आहे। तो विशद करण्या चें काम भाष्यकारा चें आहे। त्या साठी येथे सर्व भजनां वर चिंतनिका जोडली आहे। पण चिंतनिके तील चिंतनां चें स्वरूप लक्षा त घ्यावयास पाहिजे। चिंतनां चें स्वरूप अेकजिनसी कल्पिलेलें नाही। त्यां त कुठे सविस्तर भाष्य आहे, कुठे संक्षिप्त सार आहे। कुठे सरळ अनुवाद आहे, तर कुठे स्वैर संचार आहे। चिंतन करणारा स जो भाव स्फुरला तो त्या ने अनिर्बंध मांडला आहे। अेक प्रकारें ती अेक स्वतंत्र रचना च आहे। आणि मुळा ला मदत म्हणून जरी ती योजिलेली आहे तरी पुष्कळां ना स्वतंत्रपणें तिचा च अधिक अुपयोग होण्या चा संभव आहे। ज्ञानदेवा च्या भजनां चें या च प्रकारें चिंतन झाले पाहिजे असा आग्रह नाही। अुलट ज्या ला ज्या ला शक्य होओील त्या ने आपापली

जीवन-शुद्धि लक्षून स्वतंत्रपणें चिंतन करावें अशी अिच्छा आहे। येथे जोडलेली चिंतनिका केवळ दिशा सुचविणारी आहे।

महत्त्वा च्या किंवा कठिण वाटणाऱ्या शब्दां चा अर्थ-कोष जोडलेला आहे। चिंतनिके चें स्वरूप अक्षरार्थ सांगणारें नसल्या मुळे अक्षरार्थ समजण्या ला हा कोष साह्य देअील। यच्च-यावत् सर्व शब्द हि कोषा त देता आले असते; पण तें बिन-गरजे चे मानून त्या अैवजीं सढळ हाता ने पुष्कळ शब्दां चा या त संग्रह केला आहे।

हरिपाठा चे अभंग वगळता बाकी चीं ज्ञानदेवा चीं भजनें मोकळीं आहेत। तीं विशिष्ट रचने त बसविण्या ची जबाबदारी ज्या ने पतकरली त्या ने दुसऱ्या च्या भाषे त स्वतः चा ग्रंथ लिहिल्या सारखे च होते। पण जाणून च मी तसें केलें आहे। साधने च्या क्रमा विषयीं च्या माझ्या दृष्टी प्रमाणे अर्थात् मी ही रचना केली आहे। ती ज्ञानदेवा ला कितपत मानवेल हें ज्ञानदेवा शी मी किती अेकरूप झालो आहे या वर अवलंबून आहे। पण मला त्या ची फिकिर नाही। ज्ञानदेवा शी मी जितका अेकरूप होअू शकलो तितका दुसऱ्या कुणा शी झालो नाही अेवढें मला माहीत आहे। पण ही माझी च रचना ठरली तरी कांही हरकत नाही।

अध्यायां च्या नाम-करणा संबंधीं मागच्या आवृत्ती च्या प्रस्तावने त शिवाजी ने दिलेला खुलासा पर्याप्त आहे: "अनुक्रमणिके तील अध्यायां चीं पद्य नावें मूळ ज्ञानदेवा च्या पद्यां तलीं च घेतलेलीं आहेत। गद्य नावां त 'परमविरहासक्तिरूपा' आणि 'विश्वरूप-दर्शन-योग' हीं दोन नावें अनुक्रमें 'नारद-

भक्ति-सूत्रें' आणि 'भगवद्-गीता' यां त आढळून येणारीं आहेत। बाकी चीं गद्य नावें अध्यायां ना अनुरूप अशीं देण्या त आलीं आहेत।"

"हीं भजनें ज्ञानदेवा चीं च आहेत का?" या विषयीं विद्वान् मंडळी त चर्चा चालते। ज्ञानदेवा च्या नावा वर असलेलीं सुमारे अेक हजार पद्यें सर्व ज्ञानदेवा चीं च आहेत असें म्हणण्या ची सोय नाही। पण जीं पद्यें 'ज्ञानदेवा चीं च' अशी मनोमन साक्ष पटली त्यां तून हीं निवडलीं आहेत। ज्ञानेश्वरी त आणि अमृतानुभवा त हि न मांडले गेलेले कांही अनुभव यां त आहेत। त्यां त अेक नवीन योग-शास्त्र च सूचित आहे। त्यां च्या अध्ययना शिवाय ज्ञानदेवा चा अभ्यास पूर्ण होणार नाही, असें मी समजतो। पण तें कसें हि असलें तरी, अंतरंग-साधने संबंधीं ह्यां त अुपलब्ध होणाऱ्या सूचना आणि खुणा फार च मोला च्या आणि अवश्य चिंतनीय आहेत, ह्या त संशय नाही।

येथे योजिलेल्या लिपी त आणि शुद्धलेखन-पद्धती त नेहमी पेक्षा कांही फरक वाचकां ना दिसून येअील। तो वाचकां नी तूर्त सहन करावा। या विषयीं माझी अेक संपूर्ण योजना आहे। त्या संबंधीं पुढे केव्हा तरी लिहावें लागणार च आहे। सदर योजने चा थोडासा च भाग येथे लागू केला आहे।

परंधाम, पवनार

२८-११-४६

विनोबा

# भजनां ची वरणानुक्रमणी

अंक भजनांचे आहेत

# ज्ञानदेवा चीं भजनें

## प्रकरण पहिलें : साधना

**अध्याय १**

१

अमोलिक रत्न जोडलें रे तुज । कां रे ब्रह्म-बीज नोळखसी
न बुडे न कळे न भिये चोरा । ते वसूतु चतुरा सेविजेसु
ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें । आणूनि ठेविलें गुरु-मुखीं

२

सुढाळ ढाळा चें मोतीं । अष्टै अंगें लवे ज्योति
जया होय प्राप्ति । तो चि लाभे
हातीं चें निधान जाय । मग तूं करिसी काय
पोळिलिया वरी हाय । निववूं पाहे
अंगा आला नाहीं घावो । तंव ठाकी एक ठावो
बाप रखुमादेवी-वरु । विठ्ठलु नाहो

३

स्वप्नीं चां घाआीं विवळे साचें । चेअिलेया वरी म्हणे मी न वचें
जन कैसे माया भुलले । आपुलें हित आपण चुकले
आपीं आप असे । मी काय जालोंसें लोकां पुसे
बाप रखुमादेवी-वरें विठ्ठलें । कैसें गुरु-मुखें खुणा उगविलें

४

अुपजोनि संसारीं आपुला आपण वैरी
'मी' 'माझें' शरीरीं घेअुनि टेलें

देहा तें म्हणे 'मी' पुत्र दारा धन 'माझें'
काळा चें हें खाजें अैसें नेणतु गेला

काम - क्रोध - मत्सरा चेनि गुणें
बांधला आपण नेणे भ्रमितु जैसा

मिथ्या मोह - फांसा शुक नलिके जैसा
मुक्त परी आपैसा पळों नेणे

जळ-चर आमिष गिळी लागलासे गळीं
आपणपें तळमळी सुटिका नाहीं

तैसें आरंभीं विषय-सुख गोड वाटे अिंद्रियां
फळ-पाकीं पापिया दुःख भोगी

राखोंडी फुंकितां दीप न लगे जिया परी
तैसा शब्द - ब्रह्म - कुसरी ज्ञान न पवे

ज्ञानदेवो म्हणे बहुतां जन्मां चा अभ्यासु
तरी चि होय सौरसु पर - ब्रह्मीं

५

श्रवण घ्राण रसना त्वचा आणि लोचन
हीं तों दैन्या चीं द्वारें

वोळंगसी, यां चें यां सि चि न पुरे
तुज पुरविती काय

या लागीं धरिजेसु
आपुली सोय रे बापा

अरे मना रे अरे मना रे
न संडीं हरि - चरण - कमळा रे

स्वप्नीं चें धन तें धन चि नव्हे
मृग - जळीं चें जळ तें जळ चि नव्हे
अभ्रीं ची छाया ते साउली नव्हे
असे जाणोनियां वेगीं धरिजेसु आपुली सोय रे रया

तूं जयाचा जेथोनि जीवें जितासी
तया श्री हरी तें रे नोळखसी
बाप रखुमादेवी - वरा विट्ठला चिंतिसी
तेणें पावसी तूं सुखा चिया राशी रया

६

जाग रे पुत्र-राया जाओं श्री गुरू शरण
देह तूं व्यापिलासि चुकवीं जन्म-मरण
गर्भ-वास वोखटा रे तेथें दुःख दारुण
सावध होओं कां रे पुत्र तूं सुजाण

मदालसा म्हणे पुत्रा अेक बोलणें माझें
चौऱ्यांशी घरां मार्जा मन व्याकुळ तूझें
बहुत शिणतोसि पाहतां या विषयां सि
जाण हें स्वप्न-रूप येथें नाहीं बा दूजें

सांडीं रे सांडीं बाळा सांडीं संसार-छंदु
माशियां मोहळ रे रचियेला रे कंदु
झाडूनि आणिकीं नेला तयां फुकट चि वेधु
तैसी परी होईल तुज अुपदेशें आनंदु

जाणतेया अुपदेशु नेणे तो भ्रांती पडिला
तैसा नव्हे प्रकाशु ज्ञानदेवो अनुवादला
अनुभवी गुरु-पुत्र तो चि स्वयें बुझाला
अैके तया अुद्धरण गायक सहज अुद्धरला

## अध्याय २

७

चोरां चेनि संगें क्रमितां पैं पंथ। ठकूनियां घात करितील
काम क्रोध लोभ घेअूनियां संगें। परमार्था सि रिघे तो चि मूर्ख
बांधोनियां शिळा पोहूं जातां सिंधु। पावे मति-मंदु मृत्यु शीघ्र
देह गेह भ्रांति सोडूनियां द्यावें। साधन करावें शुद्ध मार्गें
ज्ञानदेवो म्हणे तरी चि साधेल। नाहीं तरी चळेल मध्य मार्गीं

८

तंव वरी रे तंव वरी जंबूक करी गर्जना
जंव तया पंचानना देखिलें नाहीं बाप

तंव वरी रे तंव वरी मित्रत्व - संवाद
जंव अर्थें सीं संबंध पडिला नाहीं बाप

तंव वरी रे तंव वरी बाधी हा संसार
जंव रखुमादेवी-वर देखिला नाहीं बाप

९

निर्जीवा दगडा ची काय करिसील सेवा
तो तुज निदैवा देईल काई

कवणें गुणें भुली पडली गव्हारा
तीर्था चेया माहेरा नोळखसी

अष्टोत्तर शें तीर्थें जया चां चरणीं
तो तुझां हृदय - भवनीं आत्मा - राम

देव जवळीं असतां जासी आना तीर्था
मुकलासि आतां म्हणे ज्ञानदेवो

१०

तीर्थ व्रत नेम भावें विण सिद्धि। वायां चि उपाधि करिसी जना
भाव-बळें आकळे येरव्हीं नाकळे। कर-तळीं आंवळे तैसा हरि
पारयाचा रवा घेतां भूमी वरी। यत्न परोपरी साधन तैसें
ज्ञानदेवो म्हणे निवृत्ती निरगुण। दीधलें संपूर्ण माझां हातीं

११

अनुभव-रहणी विण कायसें श्रवण। गरभ-अंध नेणे रत्न-किरण
गेले मेले काय सांगाल गोष्टी। स्वयें आत्म-ज्ञानी घाली परमात्मीं मिठी
बाहेजु प्रवृत्ति अंतरीं निवृत्ति। अुभयतां गति एक आहे
बाप रखुमादेवी-वरें विठ्ठलें सीं अेकांतु। द्वैताद्वैत मातु उरे चि ना

१२

वेद-वाणी चांग स्मरतां स्मरण । नित्य नारायण हृदयीं वसे
तेथील गह्वर जाणे तो विरळा । ब्रह्मीं ब्रह्म-कळा साधु-मुखें
जाप्य जप होम विधि विधान हरि । हृदयीं श्री हरि न कळे मूढा
ज्ञानदेवो म्हणे श्री हरि हृदय-स्थ । अैसी आहे भाष वेद-शास्त्रीं

१३

भावें विण भक्ति भक्ती विण मुक्ति । बळें विण शक्ति बोलों नये
कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित । उगा राहें निवांत शिणसी वायां
सायास करिसी प्रपंच दिन-निशीं । हरी सि न भजसी कोण्या गुणें
ज्ञानदेवो म्हणे हरि-जप करणें । तुटल धरणें प्रपंचा चें

## अध्याय ३

१४

शांति क्षमा दया निवती निर्व्यंग । होअूनि सर्वांग आत्मा भोगीं
नाहीं अंतराय सर्व हि चैतन्य । चिदानंद-घन बिंबलेंसे
मायिक वृत्ती चा झणें धरिसी संग । अिंद्रियां चा पांग सांडीं रया
ज्ञानदेवो म्हणे कल्पना काजळी । दीपीं दीप-मेळीं पाजळीं वो जगीं

१५

गुरु – लिंग जंगम । तेणें दाविला आगम रे
अेकाग्र करीं मन । तेणें होअील समाधान रे

जवळीं असतां जग-जीवन । कां धांडोळीसी वन रे
सांडीं अभिमान । सम धरितां ब्रह्म-ज्ञान रे

अहं - भाव करीं सम । तेणें पावसी विश्राम रे
अितुलें देअीं कृपा - दान । तेणें घडेल अमृत-पान रे

क्षुधा - तृषा हरे । निज - भाव जेणें तरे
तें जीवन दीधलें । बाप रखुमादेवी - वरें

१६

अरे मना तूं पापिष्ठा । किती हिंडसी रे नष्टा
सैरा शिणसी रे फुकटा । विठ्ठलीं विनटा स्थिर होअीं

तूं अनिवार नावरसी । तुझेनि संगें नाडले ॠषि
तूं तंव अपभ्रंशीं पाडिसी । म्हणोनि गेले गुरू सि शरण

न संडीं हरि - चरण । नाहीं नाहीं जनम - मरण
अवीट सेवीं नारायण । तेणें मी - तूंपण एक सिद्ध

ज्ञानदेव शरण हरी । मन हिंडे चराचरीं
न संडी चरण अभ्यंतरीं । नित्य श्री हरि हृदयीं वसे

१७

मन मुरे मग जें अुरे । तें तूं कां रे सेविसी ना
दिसतें परी न धरवे हातें । तें संतां तें पुसावें
तेथीं ची खूण विरळा जाणे । निवृत्ति-प्रसादें ज्ञानदेवो म्हणे

१८

वृत्ती सहित मज लपवीं । माझें मन चरणीं ठेवीं
निवृत्ति पदोपदीं गोवीं । तूं गोसावी दीनोद्धरण

कर-चरणें सीं अिंद्रिय-वृत्ति । तुझां ठाईं तूं चि हो तीं
माझी अुरो नेदीं कीरति । हें दान श्री-पति मज द्यावें

शांति दया क्षमा शुद्धि । हें हि पाहतां मज उपाधि
तुझेया नामाची समाधि । कृपा - निधी मज द्यावी

ज्ञानदेवें घेतलें दान । हृदयीं धरूनियां ध्यान
समाधी बैसला निर्वाण । कथा कीर्तन करीतु

१९

साउमा जंव जाये तंव हृदयीं चि आहे।चित्त विकासूनि पाहें चित्ता माजीं
तंव चतुर्भुज हरि हृदय - मंदिरीं । तया नमन करीं विज्ञानें सीं
शांति धरुनी बाहीं आपें आप पाहीं । मननीं निर्वाहीं न्याहाळिला
ज्ञानदेवा रूप बिंबोनि समीप । प्रपंच दुःख - रूप सुख जालें

२०

आम्ही संन्यासी संन्यासी । सदा राहों अेकांतें सीं
चित्त - चतुष्टय निरसिलें । अज्ञाना तिळोदक दिधलें
ब्रह्मा-ह-मस्मि शुद्ध ज्ञान । तेथील सांडिला अभिमान
रखुमादेवी-वरु विठ्ठलु हृदयीं । तो चि सबाह्य अभ्यंतरीं असे रया

## अध्याय ४

२१

आरंभीं आवडी आदरें आलें नाम । तेणें सकळ सिद्धि जगीं जाले पूर्ण काम
राम कृष्ण गोविंद गोपाळा । तूं माय माउली जीवींचा जिव्हाळा
तूझेनि नामें सकळ संदेहो फीटला । बाप रखुमादेवी-वरा श्री विठ्ठला

२२

सकळ-मंगळ-निधि । विठ्ठला चें नाम आधीं
म्हण कां रे जना म्हण कां रे जना । विठ्ठला चें नाम वाचे
पतित-पावन साचें । विठ्ठला चें नाम वाचे
बाप रखुमादेवी-वरु साचें । विठ्ठला चें नाम वाचे

२३

राम-कृष्ण नामें अियें दोन्ही साजिरीं । हृदय-मंदिरीं स्मरें कां रे
आपुली आपण करीं सोडवण । संसार-बंधन तोडीं वेगीं
ज्ञानदेवा ध्यानीं राम-कृष्ण-माळा । हृदयीं जिव्हाळा श्री मूर्ति रया

२४

कर्मा चिया रेखा नुल्लंघती अशेखा । म्हणोनि विशेखा केशव-सेवा
राम-कृष्ण-माळा घाल पां रे गळां । अखंड जीवन-कळा राम जपें
करावा विचार धरावा आचार । घालावा परिकर राम-नामीं
सकळां चा सकळीं तया तें आकळीं । जिह्वा हे वाचाळी राम-रती
रिघें रे शरण तुज नाहीं मरण । ठाकिसी चरण विठ्ठला चे
निवृत्ति-प्रसादें जोडे विठ्ठल-नामें घडे । ज्ञानदेवो बागडे पंढरिये

२५

देवा चिये द्वारीं अुभा क्षण-भरीं । तेणें मुक्ति चारी साधिलिया
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्या ची गणना कोण करी
असोनि संसारीं जिह्वे वेग करीं । वेद-शास्त्र अुभारी बाह्या सदा
ज्ञानदेवो म्हणे व्यासा चिये खुणे । द्वारके चे राणे पांडवां घरीं

२६

एक तत्-त्व नाम दृढ धरीं मना । हरी सि करुणा येईल तूझी
तें नाम सोपारें राम कृष्ण गोविंद । वाचे सीं सद्‌गद जपें आधीं
नामा परतें तत्-त्व नाहीं रे अन्यथा । वायां आणिका पंथा जासी झणें
ज्ञानदेवा मौन जप-माळ अंतरीं । धरोनि श्री हरि जपे सदा

२७

सात-पांच-तीन-दशकां चा मेळा । एक तत्-त्वीं कळा दावी हरि
तैसें नव्हे नाम सर्व मार्गीं वरिष्ठ । येथें कांहीं कष्ट न लगती
अजपा जपणें अुलट प्राणा चा । तेथें हि मना चा निर्धारु असे
ज्ञानदेवा जिणें नामें विण व्यर्थ । राम-कृष्णीं पंथ क्रमियेला

२८

काळ वेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं अुद्धरती
राम-कृष्ण-नाम सर्व दोषां हरण । जड जीवां तारण हरि अेक
हरि-नाम सार जिह्वा या नामाची । अुपमा त्या दैवा ची कोण वाणी
ज्ञानदेवा सांग जाला नाम-पाठ । पूर्व-जां वैकुंठ-मार्ग सोपा

२९

जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं । उच्चारणीं पाहीं मोक्ष सदा
नारायण हरि अुच्चार नामा चा । तेथें कळि-काळा चा रीघ नाहीं
तेथील प्रमाण नेणवे वेदां सि । तें जीव-जंतू सि केंवि कळे
ज्ञानदेवा फळ नाम हरि-पाठ । सर्वत्र वैकुंठ केलें असे

३०

अष्टांग - योगें न शिणिजे । यम - नियम - निरोध न कीजे रया
वाचा गीत गाअिजे वाचा गीत गाअिजे । गातां वातां श्रवणीं अैकिजे रया
गीत - छंदें अंग डोलिजे । लीला - विनोदें संसार तरिजे रया
बाप रखुमादेवी - वरु विठ्ठलु नामें । जोडे हा अुपावो कीजे रया

अध्याय ५

३१

अंड-ज जार-ज स्वेद-ज अुद्भिज्-ज आटे । हरि-नाम नाटे तें बरवें
जें नाटे तें नाम चित्तीं । रखुमादेवी - पती विठ्ठला चें
शरीर आटे संपत्ति आटे । हरि - नाम नाटे तें बरवें
रखुमादेवी - वरा चें नाम नाटे । युगें गेलीं परी उभा विटे

३२

सार सार सार विठोबा नाम तूझें सार
म्हणोनि शूळ - पाणि जपताहे वारंवार

आदि - मध्य - अंतीं निज-बीज ॐकार
ध्रुव - प्रह्लाद - अंबरीषीं मानिला निर्धार

भुक्ति-मुक्ति-शांति-सुख - दायक साचार
पतित अज्ञान जीव तरले अपार

दिवसेंदिवस व्यर्थ जात संसार
बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु आधार

३३

नित्य नेम नामीं ते प्राणी दुर्लभ। लक्ष्मी-वल्लभ तयां जवळीं
नारायण हरि नारायण हरि। भुक्ति मुक्ति चारी घरीं तयां
हरी विण जन्म तो नरक चि पैं जाणा। यमा चा पाहुणा प्राणी होय
ज्ञानदेव पुसे निवृत्ती सि चाड। गगना हूनि वाड नाम आहे

३४

जप तप कर्म क्रिया नेम धर्म। सर्वां घटीं राम भाव शुद्ध
न संडीं रे भावो टाकीं रे संदेहो। राम-कृष्णीं टाहो नित्य फोडीं
जात गोत वित्त कुळ शील मात। भजें कां त्वरित भावना-युक्त
ज्ञानदेवा ध्यानीं राम-कृष्ण मनीं। तेणें वैकुंठ-भुवनीं घर केलें

३५

त्रिवेणी-संगमीं नाना तीर्थें भ्रमी। चित्त नाहीं नामीं तरी तें व्यर्थ
नामा सि विन्मुख तो नर पापिया। हरी विण धांवया न पवे कोणी
पुराण-प्रसिद्ध बोलिले वाल्मीक। नामें तिन्ही लोक उद्धरती
ज्ञानदेवो म्हणे नाम जपा हरी चें। परंपरा तया चें कुळ शुद्ध

३६

भक्ती चें तें ज्ञान वाचे नारायण। दया ते संपूर्ण सर्वां भूतीं
ज्ञान नारायण ध्यान नारायण। वाचे नारायण सर्व-काळ
संसार-ग्रामीं नाम हें चि सांठा। पावाल वैकुंठा नामें अेकें
निवृत्ति-निरूपण ज्ञानदेवा ध्यान। सर्वत्र नारायण अेकरूप

३७

चहूं वेदीं जाण साही शास्त्रीं कारण । अठरा हि पुराणें हरि सि गाती
मंथुनी नवनीता तैसें घे अनंता । वायां व्यर्थ कथा सांडीं मार्गु
अेक हरि आत्मा जीव शिव समा । वायां तूं दुर्गमा न घलीं मन
ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसे

३८

हरि-अुच्चारणीं अनंत पाप-राशि । जातील लया सि क्षण-मात्रें
तृण अग्नि-मेळें समरस जालें । तैसें नामें केलें जपतां हरि
हरि-अुच्चारण मंत्र हा अगाध । पळे भूत-बाधा भेणें तेथें
ज्ञानदेवो म्हणे हरि माझा समर्थ । न करवे अर्थ अुपनिषदां

३९

सर्व-व्यापक सत्व देहीं आहे । परि प्राणियां सि सोये न कळे तया ची
परमार्थ तो कडू विषय तो गोडू । तया अवघडु संसार
नामा चें साधन जिह्वे लावी बाण । तया अनुदिनीं जवळीं वसे
धारणा धीट जरि होये विनट । तया प्रेम वैकुंठ जवळीं असे
ज्ञानिया सि ज्ञान ज्ञानदेवीं ध्यान । कलि-मल-च्छेदन नाम अेक

४०

समाधि-साधन संजीवन नाम । शांति दया सम सर्वां भूतीं
शांती ची पैं शांति निवृत्ति दातारु । हरि-नाम-अुच्चारु दिधला तेणें
यम-दम-कळा विज्ञानें सीं ज्ञान । परतोनि अज्ञान न ये घरा
ज्ञानदेवा सिद्धि-साधन अवीट । भक्ति-मार्ग नीट हरि-पंथीं

४१

अेक नाम हरि द्‌वैत - नाम दुरी । अद्‌वैत - कुसरी विरळा जाणे
सम-बुद्‌धी घेतां समान श्‌री हरि । यम - दमा वैरी हरि जाला
सर्‌वां घटीं राम देहा - देहीं अेक । सूर्‌य प्‌रकाशक सहस्‌र-रश्‌मि
ज्ञानदेवा चित्‌तीं हरिपाठ - नेमा । मागिलिया जन्‌मां मुक्‌त जालों

४२

सर्‌व-सुख-गोडी सर्‌व-शास्‌त्‌र-निवडी । रिकामा अर्‌ध घडी राहूं नको
लटिका व्‌यवहार सर्‌व हा संसार । वायां येर - जार हरी विण
नाम-मंत्‌र जप कोटि जाअील पाप । कृष्‌ण-नामीं संकल्‌प घालुनि राहें
निज वृत्‌ति काढीं सर्‌व माया तोडीं । अिंद्‌रियां सवडी लपों नको
तीर्‌थ-व्‌रतीं भाव धरीं रे करुणा । शांति दया, पाहुणा हरि करीं
ज्ञानदेवीं प्‌रमाण निवृत्‌ति-देवीं ज्ञान । समाधि संजीवन हरि - पाठ

## अध्‌याय ६

४३

संत भेटती आजि मज । तेणें जालों चतुर्‌भुज
दोन्ही भुजा स्‌थूळीं सहज । दोन्ही सूक्‌ष्‌मीं वाढलिया

आलिंगनें सुख वाटे । प्‌रेमें चिदानंद गोठे
हर्‌षें ब्‌रह्‌मांड अुतटे । समूळ अुठे मी - पण

या संतां परिस अुदार । त्‌रि - भुवनीं नाहीं थोर
माय बाप सहोदर । इष्‌ट मित्‌र सोयरे

कृपा - कटाक्‌षें न्याहाळिलें । आपुले पदीं बैसविलें
बाप रखुमादेवी-वरें विठ्‌ठलें । भक्‌ता दिधलें वरदान

४४

पूर्व जन्मीं सुकृतें थोर केलीं । तीं मज आजि फळा सि आलीं
परमानंदु आजि मानसीं । भेटी जाली या संतां सीं
माय बाप बंधु सखे सोयरे । यां तें भेटावया मन न धरे
अेक अेका तीर्था हूनि आगळे । तयां माजीं पर - ब्रह्म सांवळें
निर्धना सि धन - लाभु जाला । जैसा अ - चेतनीं प्राण प्रगटला
वत्स विघडलिया धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मीनली
हे पीयूषा परते गोड वाटत । पंढरिराया चे भक्त भेटत
बाप रखुमादेवी - वरें विट्ठलें । संत भेटतां भव - दुःख फीटलें

४५

आले हरी चे निवट । वीर विट्ठला चे सुभट
भेणें जाले दिग् - पट । पळती थाट दोषां चे

सतत कृष्ण-मूर्ति सांवळी । खेळे हृदय - कमळीं
शांति क्षमा तयां जवळीं । जीवें भावें अनुसरलिया

सहस्र - नामां चें हतियेर । शंख - चक्रां चे शृंगार
बळ वैराग्या चें थोर । केला मार षड्-वर्गा

अैसे अेकांग वीर । विठ्ठल राया चे डिंगर
बाप रखुमादेवी - वर । तिहीं निर्धारीं जोडिला

४६

शर्करे ची गोडी निवडावया भले । साधु निवडिले सत् - संगती
सत् - संग प्रमाण जाणावया हरि । येर ते निर्धारीं प्रपंच - जात
भानु - बिंब पहा निर्मळ निराळ । अलिप्त सकळ तैसे साधु
ज्ञानदेवो हरि जपोनि निर्मळ । सदा असे सोज्वळ निवृत्ति-संगें

४७

आम्ही कापडी रे आम्ही कापडी रे । पापें बारा वाटां पळती बापुडीं रे
समता कावडी रे समता कावडी रे । मार्जी नामामृत भरिलें आवडी रे
न लगे दंडणें रे न लगे मुंडणें रे । नाम म्हणूनि कर्माकर्म खंडणें रे
दुःख फीटलें रे दुःख फीटलें रे । बाप रखुमादेवी-वरें विठ्ठलें रे

४८

योग याग विधि येणें नव्हे सिद्धि । वायां चि उपाधि दंभ-धर्म
भावें विण देव न कळे निःसंदेह । गुरू विण अनुभव कैसा कळे
तपें विण दैवत दिधलिया विण प्राप्त । गुजें विण हित कोण सांगे
ज्ञानदेव सांगे दृष्टान्ता ची मात । साधू चे संगती तरणोपाव

४९

संतां चे संगती मनो-मार्गें गति । आकळावा श्री-पति येणें पंथें
राम-कृष्ण वाचा भाव हा जीवा चा । आत्मा जो शिवा चा राम जपें
अेक तत्-त्व नाम साधिती साधन । द्वैता चें बंधन न बाधिजे
नामामृत गोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवन-कळा
सत्वर अुच्चार प्रह्लादीं बिंबला । अुद्धवा लाधला कृष्ण दाता
ज्ञानदेवो म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे

५०

साधु-बोध जाला तो नुरोनियां ठेला । ठाईं चि मुराला अनुभव
कापुरा ची वाती अुजळली ज्योति । ठाईं चि समाप्ति जाली जैसी
मोक्ष-रेखे आला तो भाग्यें विनटला । साधू चा अंकिला हरि-भक्त
ज्ञानदेवा गोडी संगति सज्जनीं । हरि दिसे जनीं वनीं आत्म-तत्त्वीं

## अध्याय ७

५१

श्री गुरू सारिखा असतां पाठीराखा । अितरां चा लेखा कोण करी
राजया ची कांता काय भीक मागे । मना चेया जोगें सिद्धि पावे
कल्प-तरू तळवटीं बैसला जो कोणी । काय तया सी वाणी सांगिजो जी
ज्ञानदेवो म्हणे तरलों तरलों । आतां अुद्धरलों गुरु - कृपा

५२

देव करी तरी काय न होअी । दगडा चेनि नअी तरिजेल
सूर्य-किरणां वरी मुंगियां ची हारी । अग्नी चां पाठारीं पीक होय
फुटोनियां पाय चालतील भिंती । मेरु मशक येती सम तुका
ज्ञानदेवो म्हणे अघटित घडे । गुरु - कृपा जोडे पर - ब्रह्म

५३

चित्रीं सूर्य-बिंब काढूं येअील चांग । प्रकाशा चें अंग काढितां न ये
संन्यासा चें सोंग आणूं येअील सांग । वैराग्या चें अंग आणितां न ये
ब्रह्म-ज्ञान मुखें बोलूं येअील सांग । अनुभवा चें अंग आणितां न ये
ज्ञानदेवो म्हणे गुरु - कृपा सांग । तरी चि हें भाग्य येअील हातां

५४

गुरु हा संत-कुळीं चा राजा । गुरु हा प्राण-विसांवा माझा
गुरू विण देव दुजा । पाहतां नाहीं त्रैलोक्यीं

गुरु हा सुखा चा सागरु । गुरु हा प्रेमा चा आगरु
गुरु हा धैर्या चा डोंगरु । कदा काळीं डळमळी ना

गुरु हा वैराग्या चें मूळ । गुरु हा पर - ब्रह्म केवळ
गुरु हा सोडवी तात्काळ । गांठ लिंग - देहा ची

गुरु हा साधकां सि साह्य । गुरु हा भक्तां लागीं माय
गुरु हा काम - धेनु गाय । भक्तां घरीं दुभतसे

गुरु हा घाली ज्ञानांजन । गुरु हा दाखवी निज - धन
गुरु हा सौभाग्य देऊन । साधु - बोध नांदवी

गुरु हा भक्ती चें मंडण । गुरु हा दुष्टां चें दंडण
गुरु हा पापा चें खंडण । नाना परी वारीतसे

काया काशी गुरु उपदेशी । तारक मंत्र दिधला आम्हां सि
बाप रखुमादेवी - वरा सि । ध्यान मानसीं लागलें

५५

सकळ तीर्थें निवृत्ती चां पाईं । तेथें बुडी देऔं माझे मना
आतां मी न करीं चिंता चें भ्रमण । वृत्ती सि मार्जन केलें असे
अेकार्णव जाला तरंगु बुडाला । तैसा देह जाला अेक - रूप
रखुमादेवी - वरें नवल पैं केलें । तारूं हारविलें मृग - जळीं

५६

सम सुख शेज निजोनियां काज । साधिलेंसे बीज निवृत्ति - रायें
पृथ्वी-तळ शय्या आकाश प्रावरण । भूत - दया जीवन जीव - भूत
निजीं नीज आली हारपलिया कळा । ब्रह्मानंद-सोहळा गुरु-शिष्यीं
ज्ञानदेवा काज निरालंब रूप । तळीं वरी दीप सतेजला

## प्रकरण दुसरें : भक्ति

### अध्याय ८

५७

रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा
बहुतां सुकृतां ची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी
सर्व सुखा चें आगर । बाप रखुमादेवी - वर

५८

बरवा वो हरि बरवा वो । गोविंद गोपाळ गुण - गरुवा वो
सांवळा वो हरि सांवळा वो । मदन - मोहन कान्हो गोवळा वो
पाहतां वो हरि पाहतां वो । ध्यान लागलें या चित्ता वो
पढिये वो हरि पढिये वो । बाप रखुमादेवी-वरु घडिये वो

५९

रुणु झुणु रुणु झुणु रे भ्रमरा । सांडीं तूं अवगुणु रे भ्रमरा
चरण-कमल-दळु रे भ्रमरा । भोगीं तूं निश्चळु रे भ्रमरा
सुमन - सुगंधु रे भ्रमरा । परिमळ विद्गदु रे भ्रमरा
सौभाग्य - सुंदरु रे भ्रमरा । बाप रखुमादेवी-वरु रे भ्रमरा

६०

पांडुरंग - कांती दिव्य तेज झळकती रत्न-कीळ फांकती प्रभा
अगणित लावण्य तेज पुंजाळलें न वर्णवे तेथीं ची शोभा

कानडा हो विठ्ठल कर्नाटकु तेणें मज लावियेलें वेधीं
खोळ बुंथी घेऊनि खुणे चि पालवी आळविला सादु नेदी

शब्दें विण संवादु दुजें विण अनुवादु हें तव कैसेनि गमे
परे हि परौतें बोलणें खुंटलें वैखरी कैसेनि सांगे

पायां पडूं गेलें तंव पाऊल चि न दिसे उभा चि स्वयंभू असे
समोर कीं पाठीमोरा न कळे ठक चि पडिलें कैसें

रखुमादेवी-वरु हृदयीं चा जाणूनि अनुभवु सौरसु केला
दृष्टी चां डोळां पाहूं गेलें तंव भीतरीं पालटु जाला

६१

त्रि-भंगीं देहुडा ठाण मांडोनियां राहे
कल्प - द्रुमा तळीं वेणु वाजवीत आहे

गोविंदु वो माये गोपाळु वो माये
सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु माये

सांवळें सगुण सकळां जीवां चें जीवन
घनानंद — मूर्ति पाहतां हारपलें मन

शून्य स्थावर जंगम व्यापुनि राहिला अकळ
बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु सकळ

६२

माथे टेकीत बाह्या पसरीत । डांगां चे आधार घेती
एक म्हणती आम्हीं अुचलिला पर्वत । बहुत मिळोनि काय नव्हे रे

बाहे कडाडीत मनगटें लचकीत । म्हणोनि अुठिले अवघे रे
तयां माजीं असतां न दिसे बाप । समर्थ थोर तुझी मात्र रे

काळु आतुडे परि वेळु नातुडे । म्हणोनि रक्षिलें सकळां रे
बाप रखुमादेवी-वर विठ्ठल साचा । म्हणोनि रक्षिलें आम्हां रे

अध्याय ९

६३

देव आहे जैसा, तैसा नेणवे सहसा
भांबावला कैसा, विश्व - जनु

तया रूप ना रेखा, लय ना लक्षण
तो प्रतिमे सि आणून, वासना - रूपें

देव सर्व - गत, निराळा अ-द्वैत
तया मूर्तिमंत, ध्याय जनु

तिहीं देवां सि आकारु, जेथूनि विस्तारु
तो ध्वनि ॐ - कारु, त्या आरुता

तेथ नाद ना बिंदु, कळा ना छंदु
अक्षय परमानंदु, सदोदित

अवतरे तें साच नव्हे, होय तें न संभवे
आहे हें आघवें, लाघव रया

तो अेकवट अेकला, रचला ना वेंचला
आदि - अंतीं संचला, अनंतपणें

पृथ्वी आप तेज वायु आकाश
हीं सकळ हि हारपती प्रळयांतीं

तो निर्शून्य निरुपम, निरंजन निर्वाण
ते दशा पाषाण, कैंवि पावती

पाहतां या डोळां, परि न दिसे कांहीं केलां
व्यापूनियां ठेला, बाहिजु भीतरीं

तो पद - पिंडा अतीतु, भव - भाव - विरहितु
बाप रखुमादेवी - वरु विठ्ठलु हृदयांतु रया।

६४

मलयानिळ शीतळु । पालवीं न ये गाळूं
सुमना चा परिमळु । गुंफितां न ये

तैसा जाणा सर्वेश्वरु । म्हणों न ये सान थोरु
या चा स्व-रूपा चा निर्धारु । कवण जाणे

मोतिया चें पाणी । भरूं न ये वो रांजणीं
गगना सि गंवसणी । घालितां न ये

डोळेयां तील बाहुली । करूं न ये वो वेगळी
धांवोनि अचळीं । धरितां न ये

विठ्ठल-रखुमाआी चे भांडणीं । कोण करी बुझावणी
तया विठ्ठल - चरणीं । ज्ञानदेवो।

६५

सर्वादि सर्व-साक्षी तो । विश्वं-भर खल्विदं तो गे बाअी
आनंदा आनंद तो । प्रबोधा प्रबोध तो गे बाअी
रखुमादेवी-वरु तो । विटे वरी अुभा तो गे बाअी

६६

सत्य-ज्ञानानंत गगना चें प्रावरण । नाहीं रूप वर्ण गुण तेथें
तो हा रे श्री हरि पाहिला डोळेभरीं । पाहतें पाहणें दूरीं सारोनियां
ज्ञानदेवो म्हणे ज्योती ची निज ज्योति । ते हे अुभी मूर्ति विटे वरी

६७

कोणा चें हें रूप हा देह कोणा चा । आत्मा-राम साचा सर्व जाणे
मी-तूं हा विचार विवेकें शोधावा । गोविंदु हा ध्यावा या चि देहीं
ध्येय ध्याता ध्यान त्रिपुटी वेगळा । सहस्र-दळीं अुगवला सूर्य जैसा
ज्ञानदेवो म्हणे नयनां तील रूप । या नांव चित्-पद तुम्ही जाणा

६८

तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण अेक गोविंदु रे
अनुमाने ना अनुमाने ना । श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे
तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे । स्थूळ सूक्ष्म अेक गोविंदु रे
तुज दृश्य म्हणों कीं अ-दृश्य रे । दृश्य अ-दृश्य अेक गोविंदु रे
निवृत्ति-प्रसादें ज्ञानदेवो बोले । बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु रे

६९

फळा चें बीज कीं बीजा चें फळ। म्हणूनि पत्र पुष्प मूळ चोजवे ना
ऐसी हे रचना न कळे गा देवा। सिद्धान्त अनुभवा साक्ष देतो
मृत्तिके ची पृथ्वी कीं पृथ्वी ची मृत्तिका। या गति अनेका चोजवे ना
बाप रखुमादेवी-वरु निरंतरीं। सबाह्य अभ्यंतरीं नांदतसे

७०

कांहीं न करिजे ते तुझी सेवा। कांहीं नव्हेसि तें तूं देवा
नेणिजे तें तुझें रूप। जाणिजे तितुकें पाप गा देवा
स्तुति ते तुझी निंदा। स्तुती जोगा नव्हेसि गोविंदा
बाप रखुमादेवी-वरा विठ्ठला। अेवढा साभिलाष कां धरिला

अध्याय १०

७१

सकळ नेणोनियां आन। अेक विठ्ठल चि जाण
पुढती पुढती मन। अेक विठ्ठल चि जाण

गुरु-गम्य ही खूण। अेक विठ्ठल चि जाण
बुझसी तरी तूं निर्वाण। अेक विठ्ठल चि जाण

हे चि भक्ति हे चि ज्ञान। अेक विठ्ठल चि जाण
बाप विठ्ठला ची आण। अेक विठ्ठल चि जाण

७२

दीप दीपिका शशी तारा । होतु का कोटि वरी रे
परि न सरे निशी, नुगवे दिवसु । दिनकर-नाथें विण जिया परी रे

नुद्धरिजे नुद्धरिजे नुद्धरिजे । गोपाळें विण नुद्धरिजे

नगर भ्रमतां जन्म जावो । परि प्रवेश अेक्या द्वारें रे
तैसा यजिजो भजिजो पूजिजो । परि अकलु नंद - कुमरें रे

सर्वावयवीं शरीर सांग । परि विरहित अेक्या जीवें रे
तैसा धिक् तो श्रोता, धिक् तो वक्ता । जो वाळिला विठ्ठल-देवें रे

गलित - शिर हें कलेवर रे । उदकें विण सरिता भयंकर रे
रवि - शशी विण अंबर तैसें । हरी विण जिणें असार रे

शिखि - पक्षि - पत्रीं डोळे । जेंवि अकाल-जलद-पडळें रे
तैसीं गोकुळ - पालक - बाळें विण । कर्में सकळें विफळें रे

यम नियम प्राणायाम प्रत्याहार । हे सकळ अुपाय परि अपाय रे
जंव तमाळ-नीळ सांवळा हृदयीं । ठाण मांडुनि न राहे रे

मी अुत्तम पैल हीनु । भूतीं द्वेषाद्वेष ठेले रे
केलेनि कर्में अुपखा निपजे । सुख तें दूरीं गेलें रे

आतां असोत हे भेदाभेद । आम्ही असों अेक्या बोधें रे
बाप रखुमादेवी - वरु विठ्ठलु । निवृत्ति-मुनि-राय-प्रसादें रे

७३

अकार अुकार मकार करिती हा विचार । परी विठ्ठल अपरंपार न कळे रया
संतां चे संगती प्रेमा चां कल्लोळां । आनंदें गोपाळां माजीं खेळे
बाळे भोळे भक्त गातातिं साबडे । तयां चें प्रेम आवडे विठोबा सि
रखुमादेवी - वरु पर - ब्रह्म पुतळा । तेथील हे कळा निवृत्ति जाणे

७४

भजना परिस साधन आणिक । कलि - युगीं देख आन नाहीं
सर्व देहीं भजन हें चि निज ज्ञान । मग मुक्त - पण आपेआप
मीपण मावळे सद्भाव अुजळे । सुखा चे सोहळे गुरु - खूण
श्रीगुरु - निवृत्ति - चरण - प्रसादें । भजनीं आनंदे ज्ञानदेवो

७५

स्व - रूपा कारणें विश्व - रूप घेतलें । सगुणें झांकिलें निर्गुण रया
द्रष्टेया चे दीप्ती दृश्य चि न दिसे । सम-रसीं भासे तेज तयाचें
चित् - स्वरूपीं नांदे तत् - स्वरूपीं भासे । ॐकार सरिसें तदाकार
प्रेम-कळी ओतलें सोज्वळित तेज । तेथें तूं विराज ज्ञानदेवा

७६

समाधि हरी ची सम सुखें विण । न साधेल जाण द्वैत-बुद्धी
बुद्धी चें वैभव अन्य नाहीं दुजें । अेक्या केशीराजें सकळ सिद्धि
अृद्धि सिद्धि निधि अवघी चि अुपाधि । जंव तया परमानंदीं मन नाहीं
ज्ञानदेवीं रम्य रमलें समाधान । हरी चें चिंतन सर्व काळ.

७७

देह दंडूनि पाओीक अनुसरला जीवें । तंव स्वामी चें गूज हाता सि आलें
पाओीक-पण गेलें स्वामी होअुनि ठेलें । परि नाहीं विसरलें स्वामिया तें
पाओीक-पणें अैसा आठवु चि नाहीं । स्वामी वांचूनि कांहीं जाणे चि ना
रखुमा-देवी - वरु विठोजी अुदारु । पाओीक तो साचारु स्वामी केला.

## अध्याय ११

७८

लक्ष लावूनि अंतरीं । कृष्णा पाहती नर नारी
लावण्य - सागर हरि । परमानंदु

छंदें छंदें वेणु वाजे । ठाओीं ठाओीं घनु गाजे.
अुतावीळ मन माझें । भेटावया

ब्रह्म-विद्ये चा पुतळा । गाओी राखतो गोवळा
श्रुती नेणत्ते ते लीळा । वेदां सनकादिकां

निवृत्ति-दासा चा दातारु । बाप रखुमादेवी-वरु
भक्ता देतो अभय - करु । कृष्ण - कृष्णा

७९

नभ नभा चेनि सळें । क्षोभु वाहिजे कालिंदी-जळें
सासिंनले जगा चे डोळे । तें रूप पाहावया.

भलतैसी हांव । मना न पुरे तेथीं ची धांव
लावण्य-सिंधु सींव । सांडूनि जातो गे माये

कटा वरी ठेवूनि हात । जना दावी संकेत
भव-जलाबुधी चा अंत । इतुला चि

सम-चरणीं चिया खुणा । उभा पंढरी चा राणा
तो आवडे जना मना । दुर्लभ गे माये

आमुचे हृदयीं ची शरी मूर्ति । घेऊनि विठ्ठल वेषा ची बुंथी
आतां चाळविसी किती । बाप पालट नेवे

बाप रखुमादेवी-वरा विठ्ठला । तुवां मज सीं अबोला कां धरिला
जंव जीव आहे उरला । तंव निघों पाहे

८०

पाहें पां ध्वजे चें चिरगुट । राया जतन करितां कष्ट
तैसा मी अेक पतित । परि तुझा मुद्रांकित
मषी-पत्र तें केवढें । रावो चालवी आपुलेनि पाडें
बाप रखुमादेवी-वर-दा । सांभाळीं आपुलेया ब्रिदा

८१

परिमळा ची धांव भ्रमर ओढी । तैसी तुझी गोडी लागो मज
अवीट गे माये विटे ना । जवळीं आहे परी भेटे ना
तृषा लागलियां जीवना तें ओढी । तैसी तुझी गोडी लागो या जीवा
बाप रखुमादेवी-वरीं विठ्ठलीं आवडी । गोडीये सि गोडी मिळोनि गेली

## ८२

वाराणसी यात्रे जाअीन । प्रयाग-तीर्थ पाहीन
त्रि-वेणीये स्नान करीन । परि मी वीट नव्हेन
विठोबा पाअीं ची वीट । मी कअीं बा होअीन

अेकांगुष्ठीं तप करीन । पृथ्वी पात्र चि लाहीन
देह करवतीं देअीन । परि मी वीट नव्हेन
विठोबा पाअीं ची वीट । मी कअीं बा होअीन

बहुतां पुण्यां चां सायासीं । चरण जोडिले विटे सीं
निवृत्ति-दास म्हणे परियेसी । परि मी वीट नव्हेन
विठोबा पाअीं ची वीट । मी कअीं बा होअीन

## ८३

सुखा चिया गोठी आतां किती हो करणें । सुखें सुख अनुभवणें अैसें करीं
कैसेनि कीजे मना सि रक्षण । भावा सि बंधन केंवि घडे
बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु चि पुरें । सुखीं सुख मुरे अैसें करीं

## ८४

रात्रं-दिवस वाहतसें चिंता । केधवां घडौता होअीन मी
खिरजट घोंगडें फाटकें तें कैसें । वेंचिलें तैसें भोगिजे गा
वित्त नाहीं गांठीं जीवित्वा आटी । अुघडी पाठी हींव वाजे
घोंगडें देअील तो अेक दाता । रखुमादेवी-वरा मागों रे आतां

८५

कान्होबा तुझी घोंगडी चांगली । आम्हां सि कां दिली वांगली

सर्व - गत सच्चिदानंदें मिळोनि शुद्ध सत्तव-गुणें विणली रे
षड् - गुण गोंडे रत्न - जडित तुज श्याम - सुंदरा शोभली रे

षड् - विकार षड् - वैरी मिळोनि ताप - त्रयें जी विणली रे
नवा ठाओं फाटुनि गेली ती त्वां आम्हां सि दिधली रे

ऋषि मुनि ध्यातां मुखीं नाम गातां संदेह - वृत्ति विरली रे
बाप रखुमादेवी - वरे विठ्ठले तवत् - पदीं वृत्ति मुरली रे

८६

तूं माझा स्वामी मी तुझा रंक । पाहतां न दिसे वेगळीक
मी-तूं-पण जाऊं दे दूरीं । अेक चि घोंगडें पांघरों हरी
रखुमादेवी-वरा विठ्ठल राया । लागेन मी पायां वेळोवेळां

८७

पाअिका मोल नाहीं देसील तें काओ । पाओक न मागे कांहीं भोग्य-जात
देसील तें काओ न देसील तें काओ । पाओक न मागें कांहीं तुज वांचूनि
रखुमादेवी - वरा विठ्ठला चां पाओं । पाअिका मोल नाहीं तैसें जालें

**अध्याय १२**

८८

घनु वाजे घुण - घुणा, वारा वाजे रुण - झुणा
भव - तारकु हा कान्हा, वेगीं भेटवा कां

चांदु वो चांदणें, चांपे वो चंदन
देवकी - नंदनें विण, नावडे वो

चंदना ची चोळी, माझें सरव अंग पोळी
कान्हो वनमाळी, वेगीं भेटवा कां

सुमना ची सेज, शीतळ वो निकी
पोळे आगी सारिखी, वेगीं विझवा कां

तुम्ही गातसां सु-सूवरें, अैकों नेदावीं अुत्तरें
कोकिळे वरजावें, तुम्ही बाअियां नो

दरपणीं पाहतां रूप, न दिसे वो आपुलें
बाप रखुमादेवी-वरें विठ्ठलें, मज अैसें केलें

८९

पडिलें दूर-देशीं, मज आठवे मानसीं
नको हा वियोग, कष्ट होताती जीवा सि

दिनु तैसी रजनी मज, जाली गे माये
अवस्था लावुनि गेला, अझुनी कां न ये

गरुड-वाहना गंभीरा, येअीं गा दातारा
बाप रखुमादेवी-वरा, शरी विठ्ठला

९०

पैल तो गे काअू कोकताहे । शकुन गे माये सांगतसे

अुड रे अुड रे काअू । तुझे सोनेनि मढवीन पाअू
पाहुणे पंढरिराअू । घरा कैं येती

दहीं-भाताची उंडी । लावीन तुझे तोंडीं
जीवा पढिये तया ची गोडी । सांग वेगीं

दूधें भरुनी वाटी । लावीन तुझे ओठीं
सत्य सांगें गोठी । विठो येईल काई

आंबेया डाहाळी । फळें चुंबीं रसाळीं
आजि चे रे काळीं । शकुन सांगें

ज्ञानदेवो म्हणे । जाणिजे खुणे
भेटती पंढरिराणे । शकुन सांगे

९१

देऊनियां भेटी मज सीं न करी गोठी । लांचावला जीव पाठीं न राहे वो
निष्ठुर म्हणों तरी आपंगितो मा तें । व्यापूनि जीवा तें उरी उरवितो
दाखवा वो माये धरीन तया चे पाये । तया लागीं जीव आहे उतावीळ
भेटी चेनि सुखें मन चि होये मुकें । तें रूप देखें परी बोलवे ना
रखुमादेवी-वरें विठ्ठलें अंग लपवूनि । चैतन्य चोरूनि नेलें गे माये

९२

दुडी वरी दुडी साते निघाली । गौळण गो-रस म्हणों विसरली
गोविंद घ्या वो दामोदर घ्या वो । तंव तंव बोलती मथुरे चिया वो
गोविंदु गो-रसु एक चि नांवा । गो-रस विकूं आलें तुमचेया गांवा
रखुमादेवी-वरें विठ्ठलें सीं भेटी । आपुले संवसाटीं करुनि ठेला

९३

याति कुळ माझें गेलें हारपोनि । श्री-रंगा वांचूनि आन नेणें
किती वो शिकवाल मज वेळोवेळां । मी तया गोवळा रातलिये
भोग हें भोगणें मा तें नाहीं चाड । भक्ति-प्रेम गोड लेइलें माये
रखुमादेवी-वरु जीवीं चा जिव्हाळा । कांहीं केलिया वेगळा नव्हे गे माये

## अध्याय १३

९४

तूझी सेवा करीन मनो-भावें वो । माझें मन गोविंदीं रंगलें वो
नवसीं ये नवसीं ये । माझे नवसीं ये वो
बाप रखुमादेवी-वरे विठ्ठले वो । चित्त-चैतन्य चोरूनि नेलें वो

९५

रंगा येआीं वो येआीं वो येआीं
विठाआी किटाआी माझे कृष्णाआी कान्हाआी

वैकुंठ-वासिनी वो जगत्र-जननी
तुझा वेधु ये मनीं

विश्व-रूपे विश्वं-भरे कमल-नयने कमलाकरे वो
तूझें ध्यान लागो बाप रखुमादेवी-वरे वो

९६

गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना
आनु न विसंबें हरी जगत्र-जीवना

सोनिया चा दिवस आजि अमृतें पाहला
नाम आठवितां रूपीं प्रगट पैं जाला

तनु मनु शरण विनटलों तुझां पाआीं
रखुमादेवी-वरा वांचुनी आनु नेणें कांहीं

९७

माझे जीवीं ची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी
पांडुरंगीं मन रंगलें । गोविंदा चे गुणीं वेधलें
जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां रूप आनंदीं आनंद सांठवे
रखुमादेवी - वर सगुण निर्गुण । रूपें विटेवरी दाविली खूण

९८

अवघां डोळां तुज म्यां पाहावें । अवघां श्रवणीं तुज चि अैकावें
अवघी मूर्ती तुज पैं ध्यावें । अवघां चरणीं तुझां पंथीं चालावें
रखुमादेवी - वरु अदट दाविला । माझां देहीं देखिला ब्रह्माकारें

९९

अवघा चि संसार सुखा चा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक
जाअीन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देअीन पर - ब्रह्मीं
रखुमादेवी-वरा विठ्ठला ची भेटी । आपुले संवसाटीं करुनी ठेला

१००

माझिये हृदयीं बुंथी । ते डोळां सगुण-प्रीति
वाचे नाम — संपत्ति । अैसें चि असो

म्हणोनि रखुमादेवी - वरा । विठ्ठला अुदारा
भावें जोडलासि आम्हां ।
श्रुति पुराणें वर्णिती । नेति नेति तुझा महिमा

तुझें नाम रू सुंदर । हें चि निरंतर
देअीं आम्हां सर्वोत्तम रया

## प्रकरण तिसरें – दर्शन

### अध्याय १४

१०१

हरि आला रे हरि आला रे । संत-संगें ब्रह्मानंदु जाला रे
हरि येथें रे हरि तेथें रे । हरी विण न दिसे रितें रे
हरि आदी रे हरि अंतीं रे । हरि व्यापक सर्वां भूतीं रे
हरि जाणा रे हरि वाना रे । बाप रखुमादेवी-वरु राणा रे

१०२

आजि सोनिया चा दिनु । अमृतातें वर्षे घनु
सबाहेजु अभ्यंतरीं । अवघा व्यापक मुरारी
दृढ विटे मन - मुळीं । विराजित वन - माळी
बरवा संत - समागमु । प्रगटला आत्मा-रामु
बाप रखुमादेवी - वरु । कृपा - सिंधु करुणाकरु

१०३

अवचितें रोप लाविर्येलें द्वारीं । तया चा वेलु गेला गगना वेरी
मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेचितां भार कळियां सि आला
मना चिये गुंती गुंफियेला शेला । बाप रखुमादेवी - वरीं विठ्ठलीं अर्पिला

१०४

गुजगुजीत रूप सांवळें सगुण । अनुभवितां मन वेडें होय
भ्रमर - गुंफा ब्रह्म - रंध्र तें सुरेख । पाहतां कौतुक त्रैलोक्यीं
आनंद - स्वरूप प्रसिद्ध देखिलें । निज रूप संचलें सर्वां ठाअीं
ज्ञानदेवो म्हणे या सुखा ची गोडी । अनुभवा ची आवडी सेवी रया

१०५

सगुणा ची सेज निर्गुणा ची बाज । सांवळी विराजे कृष्ण-मूर्ति
मन गेलें ध्यानीं कृष्ण चि नयनीं । नित्यता पर्वणी कृष्ण-सुखें
हृदय-परिवरीं कृष्ण मनो-मंदिरीं । आमुचां माज-घरीं कृष्ण बिंबे
निवृत्ति निघोट ज्ञानदेवा वाट । नित्यता वैकुंठ कृष्ण-सुखें

१०६

देहा चेनि दीपकें जंव पाहें सभोंवतें । तंव अवचितें ध्यान केलें
निराकार वस्तु आकारा आणिली । कृपणीं कृष्ण केली सकळ सृष्टि
लय गेलें ध्यानीं ध्यान गेलें अुन्मनीं। नित्य हरि-पर्वणी सर्वां रूपीं
रखुमादेवी-वर विठ्ठल अभय । भया चें पैं भय हारपे कृष्णीं

१०७

जागृति पुसे साजणी । कवण बोलिलें अंगणीं
निरखितां वो नयनीं । वृंदावनीं देखियेला

स्वप्न सांगे सुषुप्ती । असे ममता हे चित्तीं
विठ्ठल होओील प्रतीती । मग गर्जती तुर्ये

मज बोलों न ये अैसें केलें । मन अुन्मनीं वेधिलें
बाप रखुमादेवी-वरें विठ्ठलें । थितें नेलें 'मी-माझें

१०८

तुझिये निडळीं कोटि चंद्र प्रकाशे
कमल-नयन हास्य-वदन हांसे

कृष्णा हाल कां रे कृष्णा डोल कां रे
घडिये घडिये घडिये गूज बोल कां रे

उभा राहोनियां कैसा हालवितो बाहो
बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु नाहो

१०९

देखिले तुमचे चरण । निवांत राहिलें मन
कासया त्यजीन प्राण । आपुले गे माये

असेन धणी वरी । आपुले माहेरीं
मग तो श्री हरि । गीतीं गाईन गे माये

सकळ हि गोत माझें । पंढरी सि जाण
बाप रखुमादेवी-वरा । विठ्ठला ची आण

## अध्याय १५

११०

योगियां दुर्लभ तो म्यां देखिला साजणी
पाहतां पाहतां मना न पुरे धणी

देखिला देखिला माये देवा चा देवो
फीटला संदेहो निमालें दुजे-पण

अनंत वेषें अनंत रूपें देखिलें तया सि
बाप रखुमादेवी-वरीं खूण बाणली कैसी

१११

रूप सामावलें दर्शन ठाकलें । अंग हारपलें ते चि भावीं
पाहों जाय तंव पाहणेया वेगळें । ते सुख-सोहळे कोण बोले
जेथें जाय तेथें मौन चि पडिलें । बोलवे ना पुढें काय करूं
सरिता ना संगम ओघ ना भ्रम । नाहीं क्रिया कर्म तैसें जालें

जाणों जाय तंव जाणणेया सारिखें । नवल विस्मय देखें कवणा सांगों
बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु चि अंगीं । निवृत्ति-रायें वेगीं दाखविला
आदि-अंतीं तो चि सबराभरितु । रूप-नाम-रहितु नीच-नवा

११२

सुख सोज्वळ मोतिया चें लेणें । दिधलें जाओजणें बाअिये वो
देशीं नाहीं देशाउरीं नाहीं । हाटणीं नाहीं तें पाटणीं नाहीं
लक्षा चेनि लाभें जोडलें निधान । बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु जाण

११३

सुंदर सुरेख ओतिलें, पर-ब्रह्म-तेज फांकलें
तें व्योमीं व्योम सामावलें, नयनीं वो माये

कमल-नयन सुमन फांकलें
तें परिमळाथिलें, मकरंदीं वो माये

संकोचला संसार, पारुषला व्यवहार
ब्रह्मानंद अपार, जाला वो माये

मधुर वेद-वाणी, न पवे जया चे गुणीं
ते ठाकविले निर्वाणीं, नेति नेति वो माये

या परतें बोलणें, न बोलणें होणें
तें म्यां आपुलें आंगवणें, केलें वो माये

अैसियां तो ओठीं, लागलें तया पाठी
रखुमादेवी-वरीं भेटी, विठ्ठलीं वो माये

११४

स्व-रुपा चेनि भानें बिंब हें ग्रासिलें
परी खूण न बोले काय करूं

रुपा चा दर्पण रूपें विण पाहिला
द्रष्टा हि निमाला नवल काअी

जिकडे जाये तिकडे दर्शन सांगाती
अुदो ना अस्तु हे नाहीं द्वैत-स्थिति

रखुमादेवी - वरु विठ्ठलु चि अेक
भोगी सम सुख अेकपणें

११५

कोटी ची भरोवरी सरोनि गेली शरीरीं
संसारा ची अुरी कांहीं नुरे चि गे माये

लक्षाचा लाभ मज घडला गे माये
कवणें अुपायें चरण जोडिले वो

चिंतनीं चिंतितां काय चिंतावें
तें अवघें चि मनीं रूप गिळालें गे माये

बाप रखुमादेवी-वरु देहें विण आलिंगिला
तो समर्थ माल्हाथिला बाअिये वो

अध्याय १६

११६

सुखा चा निधि सुख - सागर जोडला
म्हणोनि काळा दादुला मज पाचारी गे माये

प्रेम - नव्हाळी मज जाली दिवाळी
काळे वनमाळी आले घरा गे माये

बाप रखुमादेवी - वरु पुरोनि उरला
सबाहेजु भरला माझे हृदयीं गे माये

११७

पांचा सहित लयातीत जालियें वो
प्रेम भक्ती अनुसरलियें काळ्या रूपा सि वो

ठाओंचा चि काळा अनादि बहु काळा
म्हणोनि वेदा चाळा लाविला गे माये

बाप रखुमादेवी-वरें जन्मा वेगळें पैं केलें
म्हणोनि भाज जालियें बाभिये वो

११८

काळा लपंडाओ काळे रातरीं खेळे
मी स्व-सवें वेधिली जाय काळ्या छंदें

काळें निळें हें अम्बर भासलें
असें रूप देखिलें निरगुणा चें

ऐसा हा सांवळा माझिये दृष्टी माल्हाथिला
अजूनि गेला हा विठ्ठलु गे माये

ऐसें भुलविलें जाण काळेपणें आपणें
रखुमादेवी-वरु जाणें येर कांहीं नेणें

११९

मन मुरडोनि डोळां लेइलें। काळेपणें मिरवलें रूप तया चें
बरवें रूप काळें अमोलिक। म्हणोनियां सांगतसें शुद्ध भावें
रखुमादेवी-वरु अगाध काळें। म्हणोनि सर्वत्र अर्पियेलें

१२०

काळा पुरुष तो हा गगनीं जो नांदे। अनुभवा चे भेदें भेदला जो
भेदूनि अभेद अभेदूनि भेद। सच्चिदानंद जेथें नाहीं
ज्ञानदेव तेथें अक्षय राहिला। आत्मा म्यां पाहिला या दृष्टी सीं

१२१

निळें हें व्योम निळें हें सप्रेम। निळेपणें सम आकारलें
नीळ-वर्ण ब्रह्म नीळ-वर्ण कर्म। नीळ-वर्ण आश्रम गुरु देखें
निळेपणें वर्तों निळेपणें खातों। निळेपण पाहतों निळेपणें
ज्ञानदेव आला नीळ-वर्ण शाळा। निळेपणें गोवळा रातलियें

१२२

नीळ-वर्ण रजें नीळ-वर्ण बुझे। नीळिमा सहजें आकारली
नीळ-प्रभा दिसे नीळपणें वसे। नीळिये आकाश हारपलें
निळेपण ठेलें नीळिये गोविलें। निळेपण सोंवळें आम्हां जालें
ज्ञानदेवो निळा पर-ब्रह्मीं गोविला। कृष्ण-मूरति सांवळा हृदयीं वसे

१२३

काळें ना सांवळें श्वेत ना पिवळें
नाद-बिंदां हूनि वेगळें तें कवण रे चांगया

गोडा परिस गोड गगना हूनि वाड
चवदा भुवनां जया ची चाड तें कवण रे चांगया

ज्ञानदेवीं मानवलें माझें मज सांगितलें
दोहीं मिळोनि अेक जालें भलें केलें चांगया

अध्याय १७

१२४

मेरू परतें अेक व्योम आहे । तेथें अेक पाहे तेज:पुंज
तेज नव्हे तेज:पुंज नव्हे । शीतल नव्हे शांत हि नव्हे
रखुमादेवी-वरु विठ्ठलु हि नव्हे । नव्हे तो होये चतुर्-देहें विण

१२५

दृष्टी चें सुख अंतरीं देख । ॐकार आरुप बोलतासी
नांदुलें अैकसी बिंदुलें नेदखसी । कोंदलें चौ पासीं सांवरे ना
अुफराटिये दृष्टी निवृत्ती चां शेंवटीं । ज्ञानदेवा भेटी होअूनि ठेली

१२६

दूरीं ना जवळीं त्रि-भुवन-मंडळीं । तें मना चां मूळीं बैसलेंसें
पाहतां न दिसे भानु-प्रकाशें । येरव्हीं तें असे मशकीं रया
बोलों जातां जेणें जिह्वा चि खादली । पाहतां पाहतां नेली चर्म-दृष्टि
निवृत्ति-दास तुम्ही बहुत न बोला । रखुमादेवी-वरा ध्याअिजेसु अुगला

१२७

चंचळ चांदणें सोमें विण भासलें । तेज निमालें रवि-बिंबें विण
जगत्र-जीवनु म्हणे जगा सि कारण। तें अणु-प्रमाण तेथें दिसे
रखुमादेवी-वरु अणु-प्रमाण भासला। सगुण निर्गुण जाला बाअिये वो

१२८

निशिये चे भरीं, भानु प्रतिबिंबीं बिंबला
बिंब चि गिळूनि ठेला, बिंबा माजीं

रात्रीं सूर्य वाहे, दिनु चंद्र जाये
विपरीत गे माये, देखियेलें

अुदो ना अस्तु, तेथें कैंचेनि त्रि-गुण
आपण चि दर्पण, होअूनि ठेला

ज्ञानदेवो म्हणे, अनुभवी तो जाणे
संत तिये खुणे, संतोषले

१२९

अनुपम्य तेजें धवळलें ब्रह्मांड। विश्व-रूपीं अखंड तदाकार
रसीं रस मुरे प्रेमा चें स्फुंदन। अेक-रूपी घन हरि माझा
नाद आणि ज्योति परिपूर्ण आत्मा। परे सि महात्मा अुजेडला
निवृत्ति-अुपदेश ज्ञानिया लाधला। तत्-त्वीं तत्-त्व बोलिला ज्ञानदेवो

## अध्याय १८

१३०

विश्व-रूप पाहें तंव सभोंवतें रूपडें । पाहें चहूं कडे तें चि दिसे
काय करूं सये कैसा हा देव । माझा मज भाव अेक तत्-त्वीं
सम तेज पाहें तंव अेक चि वो तेज । ॐकार सहज निमाला तेथें
मूळ चि मूळ ख्रूण न सांपडे सरवथा । व्यापिलें गे चित्ता तेजें येणें
ज्ञानदेवो निवृत्ती सि हे ख्रूण पुसत । सांगावें त्वरित गुरु-राजें

१३१

विश्वा चें आरत माझे मनीं प्रकाशलें । अवघे चि जालें देह ब्रह्म
आवडी चें वालभ माझेनि कोंदाटलें । नवल देखिलें नभाकर गे माये
रखुमादेवी-वरु सहज नीटु जाला । हृदयीं नीटावला ब्रह्माकारें

१३२

अगाधपण माझे अंगीं बाणलें
वरपडें देखिलें मृत्तिका - लिंग

तया सि चैतन्य नाहीं चळण नाहीं
गुण नाहीं रूप नाहीं

माझां शरीरीं ज्योतिर् - लिंग अुगवलें
अगाध कवळिलें इस्तें विण

रखुमादेवी - वरु ज्योतिर् - लिंग विश्व - नाथ
तेणें माझा मनोरथ पुरविला गे माये

१३३

स्वर्ग जया ची साळोंखा । समुद्र-पाळी पिंड देखा
शेषा सारिखी बैसका । जो आधार तिहीं लोकां

लिंग देखिलें देखिलें । त्रि-भुवनीं विस्तारलें

मेघ-धारीं स्नपन केलें । तारा-पुष्पीं वरि पूजिलें
चंद्र-फळ जया वाहिलें । ओंवाळिलें रवि-दीपें

आत्म-नैवेद्य समर्पिलें । ब्रह्मानंदीं मग वंदिलें
ज्योतिर्-लिंग हें ध्याइलें । ज्ञानदेवें हृदयीं

१३४

चहूं शून्यां आरौतें महाशून्या परौतें । सर्वां सि पाहतें तें चि तें गा
शून्य निर्शून्य दोन्ही हारपलीं । तेथूनि पाहिली निज वस्तु
ध्येय ध्याता ध्यान निरसूनि तीन्ही । जालों निरंजनीं अति लीन
ज्ञानदेवो म्हणे अनुभवी तो जाणे । गुरु-मुखें खूण सांगितली

## अध्याय १९

१३५

जाणोनियां नेणपण अंगीं बाणलें
नेणोनियां जाणपण सहज नेणवलें वो माये

आत्म-ज्ञाना ची गति जाली निवांत
प्रबोध-तत्त्व मी पावलें वो माये

गुरु-मुखें जैं जोडे तैं फिटे सांकडें
रखुमादेवी-वर कोडें कवतिकें वो माये

१३६

जाणों गेलियें तंव जाणणें राहिलें
पाहों गेलियें तंव तें चि जालें गे माये

इंद्रियां सहित चित्त ठकलें चि ठेलें
मी माझें विसरलें स्वयें भाव

ऐकोनि देखोनि मन होय आंधळें
परतोनि मावळे नाहीं तेथ

अविद्या निरसली माया तुटली
त्रि-गुण-साउली तेथें रूप कैंचें

चांग विचारिलें विवेकें उगवलें
ज्ञान हारपलें तया माजीं

मुकियाचे परी आनंदु भीतरीं
अमृत जिव्हारीं गोड लागे

बाप रखुमादेवी-वरु विठ्ठलु जागे
संत ये खुणे संतोषले

१३७

चैतन्य चोरुनि नेलें चित्त माझें सर्व गेलें
पाहें तंव तंव तन्मय जालें गे माये

देवें नवल केलें मन माझें मोहिलें
विसरु तो आठवु जाला गे माये

या सि जाणावया लागीं अनुहतें पाहें
तंव त्रि-भुवन तन्मय जालें गे माये

बाप रखुमादेवी-वरें विठ्ठल-रायें
माझें सबाह्य अभ्यंतर व्यापिलें गे माये

१३८

आपुला गुण-ग्राम सांडोनियां गेलियें
निवांत राहिलियें निर्गुणीं वो माये

परोपरी पाहतां सर्व-रूपीं गोपाळ
तो मज पासीं परी वेळ न लगतां वो माये

अनुवाद खुंटला सर्वांगें भेटला
गुण-ग्राम तुटला सहज वो माये

असें त्यां रूपें आपुलें आपण चि केलें
रखुमादेवी-वरें विठ्ठलें वो माये

१३९

भेटी सि गेलियें तंव तें चि जालियें
भुलली ठेलियें मज न कळे कांहीं

परतलिया दृष्टी जव मागुतां न्याहाळीं
तंव काळी ना सांवळी मूर्ति चोजवेना

काय सांगों माये न कळे तया ची सोये
येणें मना चे मोडूनि पाये वेधियेलें

आशे चिये हांवे तंव तो परता चि धांवे
निराशे सि पावे वेळु न लगतां

रखुमादेवी - वरीं विठ्ठलीं अुपाओ
ज्ञानदेवा भावो निवृत्ति - पाअीं

१४०

मज माजीं पाहतां मी - पण हारपलें। ठकलें चि ठेलें सये मन माझें
आंत विठ्ठलु बाहेर विठ्ठलु। मी चि विठ्ठलु मज भासतसे
मी-पण माझें नुरे चि कांहीं दुजें। अैसें केलें निवृत्ति-राजें म्हणे ज्ञानदेवो

१४१

अधिक देखणें तरी निरंजन पाहणें
योगिराज विनवणें मना आलें वो माये

देह बळि देअूनि साधिलें म्यां साधनीं
तेणें समाधान मज जोडलें वो माये

अनंगपण फीटलें माया-छेंदा सांठविलें
सकळ देखिलें आत्म-स्वरूप वो माये

चंदन जेंवि भरला अश्वत्थ फुडला
तैसा म्यां देखिला निराकार वो माये

पुरें पुरें आतां प्रपंच पाहणें
निजानंदीं राहणें स्वरूपीं वो माये

अैसा ज्ञान - सागरु रखुमादेवी - वरु
विठ्ठलु निरधारु म्यां देखिला वो माये

१४२

निरंजन-वना गेलियें साजणी
तेथें निर्गुणें माझां मनीं वेधियेलें

सुखा ची अति प्रीति जाली गे ब्रह्मीं
श्री गुरु निवृत्ति मुनि मी जालें गे माये

रखुमादेवी-वरु विठ्ठलु सहजावला
निर्गुण दाविला विसुरा गे माये

अध्याय २०

१४३

चातकें विण लक्ष अंतरीं चि ठसलें । तेथें अेक वोळलें ब्रह्म-मेघ
तें जीवन अमृत जीवा सि आलें । तया हूनि अेक आगळें गे माये
रखुमादेवी-वरु हातें विण स्पर्शलें । चक्षू विण देखिलें ब्रह्म गे माये

१४४

पावलों जी म्हणें, देखिलें देखणें
गेली आधीं तेणें, दृष्टि माझी

अुचललिया बाह्या, क्षेम देअीन तया
गेली माझी माया, देह-त्यागें

आनंदें स्फुंदत, येती अश्रु-पात
अगा गुरु-नाथ, देवराया

निवृत्ति-दास म्हणे तूं तें जीवें ओवाळिलें
शिर निरोपिलें, तुझां चरणीं

१४५

तूं तों माझें मी तों तुझें । अैक्य जालें तेथें कैचें दुजें
तूं तो मी गा मी तो तूं गा । अज्ञानें बापुडीं नेणती पैं गा
निर्गुण होतें तें गुणा सि आलें । अज्ञान निरसूनि अेक चि जालें
ज्ञानदेवो म्हणे परतूनि पाहीं । जीवा चा जीवनु कवणे ठाअीं

१४६

देव पूजूं गेलों ठेवोनियां भाव । तंव जालों देव स्वतः-सिद्ध
नाठवे चि कांहीं देव - भक्तपण । सागरीं लवण मेळविजे
चराचर रूप देव चि पैं जाला । लय होअुनि ठेला आत्म-रूपीं
नाहीं आवाहन कैंचें विसर्जन । स्व-रूपीं चि लीन ज्ञानदेवो

१४७

आतां या परतें अुरलें नाहीं कांहीं
देहीं चि विदेही होअुनि ठेलों

आमुचे आम्ही देव आमुचे आम्ही भक्त
आमुचे आम्ही मुक्त अेक - विध

आमुचें आम्ही ज्ञान आमुचें आम्ही ध्यान
सोहं - रश्मि खूण हाता आली

ज्ञानदेवो म्हणे निर्गुण निरंजन
मना चें मोहन मूर्ती माजीं

१४८

दुधा वरली साय निवडूनि दीधली । तैसी परी जाली आम्हां तुम्हां
धालों मी ब्रह्में अुद्गार संभ्रमें । अनुदिनीं प्रेमें डुल्लतसें
नाठवे आशा देहा वरी अुदास । मी-तूं-पण भास चोजवेना
रखुमादेवी-वरु मुरोनि राहिला । तो आनंदु देखिला संत-जनीं

१४९

जिणें देअुनि देहीं निःशंक होअिजे । मां मरणें मरण तया सि म्हणिजे
जिणें तें काअी मरणें तें काअी । जिणें मरणें दोहीं चोजवे ना
सिंधु-बुडबुडा क्षणा माजीं आटे । सिंधु-बुडबुडा कधीं चि नाटे
बाप रखुमादेवी-वरा चां पाअीं । ज्ञानदेव पाहीं मरण जाणे

## अध्याय २१

१५०

धर्म जागो निवृत्ती चा हरि-नामें अुत्सावो
कर्म धर्म लोपलें माझें फिटला संदेहो
धर्म अर्थ काम पूर्ण दान मान समूहो
नेघें मी इंद्रिय-वृत्ति राम-कृष्ण-नामीं टाहो

कल्पना मावळली कल्प-वृक्ष-तळवटीं
चिंता हारपली माझी नित्य अमृता ची वाटी
मन हें मग्न जालें नित्य वसे वैकुंठीं
ताप-त्रय पाप गेलें नाना दोषां चे थाटीं

आत्मा-राम निरगमले वेद-शास्त्र-गुह्य-ज्ञानें
वासना चि मोहो-जाळी ते विराली नाना स्थानें
फुटले नाना घट तुटलीं बंधनें
सुटलिया जीव - ग्रंथी अैसें केलें गुरु - ज्ञानें

बुद्धि बोध संवगडे सजीव कर - चरण
नयनीं नयन जाले चक्षु मी समाधान
दिव्य देह अमृत - कळा दश दिशा परिघन
सर्व हें ब्रह्म जालें फळलें विज्ञान

निवृत्ति गुरु माझा अंधपण फेडिलों
सर्वत्र दृष्टि जाली अेक - तत्-त्वें राहिलों
निरसलीं माया - मोहो रामांजन लेअिलों
ज्ञानदेवो ज्ञान - गंगे निवृत्ती बुडाविलों

# ज्ञानदेवा चीं भजनें : चिंतनिका

## प्रकरण पहिलें : साधना

१

नर-देह म्हणजे अेक अमोलिक रत्न आहे। तो जणू ब्रह्म-बीज च आहे। सर्व प्रकारे निर्भय अशा आत्म-ज्ञाना ची त्या त शक्यता आहे। आणि ती सिद्ध करण्या त च माणसा चें चातुर्य आहे।

ज्ञानदेव म्हणतो, तें आत्म-ज्ञान माझ्या कायम चें हाता त आलें आहे। आणि गुरु-मुखा ने लाभलेल्या शब्दां त मी तें साठवून ठेवलें आहे।

२

ज्ञान-बीज-रूप नर-देह म्हणजे आठी अंगा ने अुज्ज्वल असें मोती आहे। पूर्व पुण्या ने च लाभत असतें। तें हात चें निघून गेल्या वर पश्चात्-ताप करण्या त अर्थ नाही। वेळीं च सावध होअून त्या च्या साह्या ने मुक्काम गाठला पाहिजे। प्रभू चें दर्शन केलें पाहिजे।

३

घाव स्वप्ना तला, पण दुःख खरोखर चें। जागा झाल्या वर दोन्ही खोटीं ठरतात। आहे आपल्या च ठिकाणीं। पण आत्मोद्धारा चा प्रयत्न करीत नाही। आणि माझी काय गत म्हणून लोकां ना विचारीत सुटतो! अीश्वरा च्या अिच्छे ने, आणि गुरु-कृपे ने, जीवन-दृष्टि लाभली म्हणजे सारें च कोडें उलगडतें।

४

जन्माला येऊन मनुष्य आपण च आपलें वैर करीत असतो। देह मी आणि पुत्रादिक माझे, अशी कल्पना करून 'शुक-नलिका'-न्याया ने स्वतः ला बांधून घेतो। काम-क्रोध-मत्सरां च्या पाशां नी आपल्या ला जखडून टाकतो। आणि आभासिक अिंद्रिय-सुखा त गुंतून परिणामी दुःख भोगतो। केवळ शाब्दिक ज्ञाना ने या तून सुटका होणें नाही। दीर्घ काल पर्यंत सतत साधने चा अभ्यास करीत राहिलें पाहिजे। तर च शेवटीं ब्रह्म-दरशन लाभून सुटका होअू शकते।

५

अिंद्रियां च्या नादीं लागणें म्हणजे दीनवाणेपणा पतकरणें आहे। त्यां चें च कधी समाधान झालें नाही, तर तुझें तीं समाधान काय करणार? स्वप्ना तलें धन, मृग-जला चें पाणी, ढगा ची सावली आणि अिंद्रियां चा आधार सारख्या च किमती चीं। म्हणून ह्यां चा नाद सोडून तू आपली सोय पहा। तुझा जीवनाधार अंतरात्मा श्रीहरि आहे। त्याचें चिंतन करीत जा। त्या त सुखा च्या राशी साठविलेल्या आहेत।

६

मदालसा आपल्या मुलाला अुपदेश करीत आहे:—"मुला जागा हो। गुरू ला शरण जा। देह-बुद्धि सोडून जन्म-मरणा ची यातना चुकव। अनेक योनि धरायच्या आणि सोडायच्या म्हणजे शक्ती चा विना-कारण क्षय, आणि अेक सुदीर्घ यातना च म्हणावयाची। गरभ-वास म्हणजे तर पराधीनते ची कमाल। पराधीनते सारखें दुःख कोणतें असणार? आणि अितकें करून

काय मिळविशील ? काही विषय-संपादन करशील। तर मधमाशां चा मध जसा लोक लुटून नेतात, तसा अिंद्रियें तो सारा विषय लुटून नेतील। आणि तू अुघडा पडशील। म्हणून हा अुपदेश अैक। त्या ने तुला सुख लाभेल।"

वस्तुतः जाणत्या ला या जगा त अुपदेश च भरलेला आहे। पण नेणता भ्रमा त सापडतो। त्या मुळे त्या ला प्रकाश लाभत नाही। त्या साठी ज्ञानदेवा ने मदालसे च्या उपदेशा चा अनुवाद केला आहे। अनुभवी गुरूं चा अनुग्रह ज्या ला लाभला, तो त्या तलें मर्म सहज च समजेल। हें अैकणारा चा अवश्य अुद्धार होअील। कारण, गाणारा स्वतः अुद्धरला आहे।

७

चोरां च्या संगती त मार्ग आक्रमणें म्हणजे आपला घात करून घेणें च नव्हे काय? काम-क्रोध-लोभरूप त्रि-कूटा सह परमार्था त शिरू पाहणें म्हणजे केवळ वेडेपणा होय। देह-गेहा विषयीं च्या संकुचित कल्पना ज्या उरा शी बांधून ठेवल्या आहेत, त्या सर्व सोडून चित्त-शुद्धि-पूर्वक ज्ञान-साधन आचरिलें तर च तारण आहे अन्यथा मध्ये च घात होअील।

८

मनुष्या चा मुख्य वैरी अर्थ-लोभ आहे। अर्थ-लोभ राखून मनुष्य मित्रां ना हि गमावून बसतो। बरें, अर्थ-लोभ कशा साठी राखायचा म्हणता? संसारा त अडचण राहू नये म्हणून। पण ओीश्वरा च्या भक्ता ने संसारा ची अडचण कधी जाणली च नाही। तो तर जगभर मित्र जोडीत च जाणार।

९

नर-देहा ने प्राणि-मात्रां ची प्रेम-पूर्वक सेवा करतां येते। ती टाळून निर्जीव मूरती च्या दर्शना साठी तीर्थ-यात्रा दि करीत बसतोस। त्या चा काय उपयोग ? हृदय-मंदिरा त लपून बसलेला तीर्थां चा तीर्थ-रूप जो आत्मा-राम त्या चें दर्शन हवें आहे। त्या साठीं हृदय-शुद्धि आणि जवळच्या जीव-सृष्टी ची सेवा हा च अुपाय आहे। तिकडे लक्ष न देशील तर, अेवढा नर-देह लाभून फार मोठी संधि गमावून बसलास असें होअील।

१०

भक्ती शिवाय तीर्थ, व्रत, नेम आदि अुपाधि च ठर् पाह- तात। भक्ति असेल तर देव म्हणजे तळहाता वर चा आवळा। भक्ति नसेल तर लाख प्रयत्न करून हि हाता त यायचा नाही। जसा जमिनीवर सांडलेला पारा। ज्ञानदेव म्हणतो, निवृत्तिदेवां नीं, अति दुर्गम असें निर्गुण तत्त्व, ही भक्ती ची वाट दाखवून, मला सुलभ करून दिलें।

११

आचरणा शिवाय आणि अनुभवा शिवाय केवळ श्रवणा ने आत्म-ज्ञाना ची गोडी कशी कळणार ? जन्मा चा आंधळा रत्ना ची पारख काय करणार ? पूर्वी च्या ज्ञानी पुरुषां च्या नुसत्या गोष्टी काय कामाच्या ? स्वतः आत्म-ज्ञान संपादन करून अीश्वर-चरणीं मिठी मारू तेव्हा च खरें। बाहेर अखंड प्रवृत्ति चालू आहे, आत अखंड निवृत्ति आहे, आणि दोन्ही मिळून स्थिति अेक आहे, असें ज्ञानी पुरुषा चें जीवन असतें। त्या चा नेहमी अीश्वरा शी च अेकान्त

असतो । द्वैत अद्वैत या शाब्दिक चर्चे ला तेथे अवकाश च नाही । हें सारें प्रत्यक्ष अनुभवा शिवाय कसें कळणार ?

१२

वेदाध्ययन अुत्तम झालें, हें कशावरून ओळखावयाचें ?— नारायणा चें हृदया त निरंतर स्मरण राहू लागलें म्हणजे । जप, जाप्य, होम आदि हें काही वेद-रहस्य नाही । अुलट हृदया त हरि जागला म्हणजे या सर्वां ची अवश्यकता च तो हरीत असतो । ब्रह्मा त स्थिर राहून जीवन ब्रह्म-मय करण्या ची कला साधणें हें वेद-रहस्य साधु-मुखा ने कळत असतें । हृदया तील हरी ला जागविण्या साठी च तर वेदादिकां चा जन्म आहे !

१३

श्रद्धे शिवाय भक्ति नाही आणि भक्ती शिवाय मुक्ति नाही । बल-संपादना शिवाय शक्ति कुठून येणार ? धडपड सोडून निवांत होअून रहा । म्हणजे देवता कशी त्वरित प्रसन्न होते हें कळेल । तुझी धडपड चालली आहे साधने च्या नावा वर । पण आहे ती संसारा ची च । कारण ती त भक्ती चा ओलावा नाही । म्हणून तू श्रद्धा पूर्वक हरी चा ध्यास घे । म्हणजे संसारा चें धरणें तुटेल आणि साधने ची धडपड हि जिरेल ।

१४

शांति, क्षमा, दया यां ची अुत्तम परिपक्वता संपादन कर । आणि पुढे त्यां ची वाफ जिरल्यावर खुशाल विश्वात्मैक्या चा आनंद भोगीत रहा । बाधा काही च नाही । कारण, हें सर्व सहज च चिदानंद-रूप आहे । माये च्या मोहा त सापडून गाफिल-

पणा ने अिंद्रियां च्या अधीन होअू नकोस म्हणजे झालें । कल्पने ची काजळी काढून टाक । आणि दिव्या ला दिवा लावून सारें जग अुज्ज्वल कर ।

१५

ज्ञानदेवा ला अेकदा अेक जंगम गुरु भेटला होता । त्या ने आपल्या शास्त्रा चें सार थोडक्या त सांगितलें, तें असें—"मन अेकाग्र कर । वन धुंडाळू नको, कारण देव जवळ च आहे । अभिमान सोडून दे, अथवा सर्वां विषयीं तो समान राख । अेवढ्या ने तुझी सारी तळमळ शांत होअून तू प्रकृती ला तरून जाशील, आणि तुला अमृत-जीवन लाभेल ।"

१६

द्वाड मन अुगीच सैरावैरा भटकत राहतें । मोठ्या-मोठ्यां ना हि आवरत नाही । म्हणून शेवटीं गुरू स च शरण जावें लागतें । मन जर कोण्या अुपाया ने हरि-चरणीं स्थिर होअील, आणि तिथली अवीट गोडी चाखील, तर सारें च काम होअील । कारण, मग मी-तूं-पणा च अुरणार नाही । पण हें सहसा जमत नाही ।

त्या साठी ज्ञानदेवा ने अेक निराळी च युक्ति सुचवली आहे । ज्ञानदेव म्हणतो, मना ला सृष्टी मध्ये हिंडू द्यावें आणि स्वतः साक्षि-रूपानें मना हून अलग होअून हरि-शरण रहावें । आतली हरी ची गाठ पक्की असल्या नंतर, मना ला बाहेर हिंडू देण्या ने मना ची शक्ति जगत्-सेवे कडे; आणि तदुपयोगी ज्ञान-संपादना कडे, सहज च राबवता येते ।

१७

मना तील भावनां च्या गोडी त च माणूस रमतो । पण त्या भावनां सकट तें मन मुरलें म्हणजे मग जें काही उरतें त्या ची गोडी

विशेष च आहे। हें लक्षा त तर येतें, पण तितका धीर हि धरवत नाहीं आणि साधन हि करवत नाहीं। म्हणून अनुभवी संतां ची सेवा करून त्यां ना विचारावयास पाहिजे। निवृत्तिनाथां चीं कृपा लाभलेला ज्ञानदेव हें स्वानुभवा ने सांगत आहे।

१८

ज्ञानदेव नाम-संकीर्तन करीत करीत निकराची समाधि लावून बसला। त्या वेळीं त्या ने हृदया त ध्यान धरून देवा पाशी असें वर-दान मागितलें :

"वृत्तीं सकट माझा अहंकार लपू दे। माझ्या प्रत्येक प्रवृत्ती त निवृत्ती चा ठसा अुमटू दे। माझें मन तुझ्या चरणीं राहू दे। माझीं देहेंद्रिया दि सर्व तू च हो। माझी कीर्ति अुरू देअू नको। दया-क्षमा-शांतिरूप अृद्धि ही हि मला अुपाधि वाटू लागली आहे! म्हणून मला केवळ तुझ्या नामा ची समाधि लाभू दे।"

१९

अीश्वरा चा शोध करीत करीत पुढे पुढे जावें, तर शेवटीं लक्षा त येतें की तो हृदया त च आहे। म्हणून, तू आता बाहेर च्या शोधा त न पडता, चित्ता चा विकास करून त्या त च शोध घे। चित्त-चतुष्टयरूप चार भुजां नी नटलेला तो प्रभु तुला हृदय-मंदिरा त विराजमान दिसून येअील। विज्ञाना चा अहंकार सोडून त्या च्या चरणीं लीन होअून जा। चिंतना ची कड गाठून निरखिलेला तो च मग सहज शांती ने अनायास दिसत राहील। ज्ञानदेवा च्या हृदया त अगदी जवळा त जवळ तें च रूप ठसावल्या मुळे, दुःख-रूप मानलेला प्रपंच त्याला सुखा चा झाला आहे।

२०

आम्ही नित्य संन्यासी आहो। समाजा त असून हि अेकांता त राहतो। सोडायच्या वस्तु आत च होत्या, त्या सर्व सोडल्या। चित्ता ची संगत सोडली; अज्ञाना चा संपर्क सोडला; सोहंते चा हि अभिमान सोडला। आता आत आणि बाहेर ओश्वर च उरला। म्हणून सोडण्या ची कल्पना हि सुटली!

२१

प्रीती ने आणि श्रद्धे ने ओश्वरा चें नाव घेअून शुभ कार्या चा आरंभ केला म्हणजे तें कार्य फळलें च पाहिजे। कारण ओश्वरा च्या नावा ने बुद्धि निःशंक होते। आणि कर्मा त जिव्हाळा दाखल होतो। निःशंक बुद्धी ने आणि जिव्हाळ्या ने केलेलें कर्म कसें सिद्ध होणार नाही?

२२

ओश्वरा चें नाव अवश्य पतिता ला पावन करणारें आणि पुण्यवंता ला मांगल्य देणारें आहे। मंगल-निधि च तें आहे। खऱ्या भावने ने समुदाया सकट, कार्यारंभीं आणि सदा सर्व-काळ, घोकीत च रहावें।

२३

राम आणि कृष्ण हीं देवा चीं दोन्ही नावें फार सुंदर आहेत। अेक सत्य-मूर्ति, अेक प्रेम-मूर्ति। दोन्ही मिळून अेक च। हृदय-मंदिरा त त्या ची स्थापना कर। म्हणजे सर्व बंधनें तुटून तुझ्या च शक्ती ने तुझी सुटका होओील। ज्ञानदेव ध्यान करीत असताना वाणी ने हीं नामें जपतो आणि हृदया त अुभय-रूप-मंडित श्रीमूर्ती चें चिंतन करतो।

२४

माणूस अेकदा कर्म-विपाक-प्रक्रीये त सापडला म्हणजे पूर्णपणे सुटका कधी च व्हायची नाही। अीश्वर-भक्ति कर्म-विपाका तून सोडवते, ही च तिची विशेषता। अखंड कर्में करून कर्म-विपाका तून अलिप्त राहणें ही मुख्य जीवन-कला आहे, आणि अीश्वरा च्या नावा ने ती च साधत असते। म्हणून बाहेरून कर्म-योग आचरावा, आतून निरंतर विचार करावा, आणि राम-नामाची कास बळकट धरावी।

जो सगळ्यां चा आहे, आणि सगळ्यां मध्ये आहे, त्या चें आकलन व्हावयास पाहिजे। अर्थात् व्यक्ती चा अहंकार, व्यक्ती चें नाव, लोपलें पाहिजे। म्हणून वाणी ला राम-नामा चा चाळा असू दे। त्या ला शरण जा। म्हणजे तुझें व्यक्तित्व लोपून तू अमर होशील। निवृत्ती च्या प्रसादा ने ज्ञानदेवा ला हरि-नाम लाभलें। तो हरि-नामा ला चिकटला आणि आपलें व्यक्तित्व विसरून, संत-समाजा शी समरस झाला।

२५

जो रोज क्षणभर तरी देवा च्या द्वारा त अुभा राहतो तो मोक्षाभिमुख झाला। वाणी हें देवा चें द्वार होअू शकतें। मनुष्या ला संसारा त वागावें लागत असलें तरी वाणी त त्या ने संसार भरू नये। वाणी हरि-नाम-स्मरणा कडे च योजावी। नाम-स्मरण करणारा ला भगवान् वश होतो या विषयीं व्यासादिकां ची साक्ष आहे।

२६

तत्त्व-ज्ञाना च्या चर्चा कर-करून अनेकां नी अनेक तत्त्वें शोधून काढलीं आहेत। पण नाम हें सर्व-श्रेष्ठ आणि सर्व-सुलभ तत्त्व आहे। म्हणून अन्य मार्ग सोडून अंतःकरण-पूर्वक

वाणी ने नाम जपत रहावें । ज्ञानदेव तर निरंतर अंतःकरणा त मौना ने च हरि-नाम जपत असतो ।

२७

सांख्य-मार्गा ने पंचवीस तत्त्वां चें विश्लेषण करावयाचें । पण अितकें हि करून शेवटीं तत्त्व-सार-रूप हरि गाठला तर च ती विश्लेषणा ची कला साधली म्हणावयाची । नाम-स्मरणा त ती काही च भानगड नाही । कारण तेथे आरंभा पासून च हरी शी गाठ आहे ।

योग-मार्गा ने प्राण अूर्ध्व-गामी करून अनाहत-स्वरूप अ-जपा जपावयाचा । पण तें हि मनाच्या निर्धारा शिवाय साधावयाचें नाही । नाम-स्मरणा त तर मना चा निर्धार आधी चा च आहे ।

म्हणून, नाम-स्मरण हा च पंथ-राज आहे । त्या शिवाय जीवन व्यर्थ आहे ।

२८

सर्व-सार-रूप हरि-नाम जिह्वे वर असणें या सारखें भाग्य नाही । त्या ला काही काळ-वेळे चें हि बंधन नाही । दोषापहारी असें तें हरि-नाम, गाणाऱ्या आणि अैकणाऱ्या दोहों चा हि अुद्धार करणारें आहे । ज्ञानदेवा ला सांगोपांग नाम-पाठ साधल्या मुळे त्या च्या पूर्वजां ना, अृषि-मुनीं ना हि, मोक्षा चा मार्ग सोपा झाला आहे । नाही तर, काय काय कठिण साधनें त्यां ना करावीं लागत होतीं !

२९

हरिनाम-स्मरणा त जाणिवे ला किंवा नेणिवे ला विशेष किंमत नाही । मुख्य, भाव पाहिजे । भाव-पूर्वक हरि-नामा चें अुच्चारण

करीत गेल्या ने, नकळत हृदया ची शुद्धि होत च जाते। नाम-स्मरणा ची ही जादू वेदां ना हि पूर्णपणे आकलन झालेली नाही। मग सामान्य जीवा ला ती कशी कळणार? नाम-स्मरणा ने हें जग च वैकुंठ-स्वरूप, मोक्षधाम, होअून जातें।

३०

साधका ला यम-नियम-पूर्वक चित्ता चा निरोध करणें अगत्या चें असतें। त्या साठी अभ्यास-वैराग्य-युक्त अष्टांग-योग हा अेक शास्त्रीय अुपाय सांगितलेला आहे। पण योगा ने साधणारें हें कार्य अीश्वर-प्रणिधाना ने सुलभता-पूर्वक होतें, असें योग-शास्त्र च सांगतें। म्हणून ज्ञानदेव म्हणतो, तुम्ही हरि-नाम गा, अैका। त्या त तन्मय व्हा। आणि सहज मौजे ने संसार तरून जा। शास्त्रीय अुपाय बिकट जातो, तर हा सुलभ अुपाय तरी अवश्य करा।

३१

शरीर जाअील, संपत्ति जाअील, सृष्टि जाअील, शेवटीं काल हि जाअील। परंतु अीश्वरा चें नाव जाणार नाही। कारण, सर्वां चा मूलाधार असा तो प्रभु आपल्या अधिष्ठाना वर सनातन अुभा च आहे। आणि तो आणि त्या चें नाव अेक च आहेत।

३२

अीश्वरा चें नाव साधने ला बीज-रूप असल्या मुळे आरंभा पासून अखेर पर्यंत सर्व च भूमिकां ना आपापल्या परी अुपयोगा चें आहे। म्हणून शंकरा सारखे ज्ञानी, ध्रुव-प्रह्लादादिकां सारखे भक्त, आणि सामान्य अज्ञान जीव, नामा चा आश्रय घेत असतात।

आणि तें नाम त्यां च्या त्यां च्या वासने प्रमाणे त्यां ना त्यां ना भुक्ति मुक्ति शांति आदि जें हवें असेल तें देत असतें।

पण अेवढें तें सर्‌व-सार-रूप हरि-नाम दुर्‌लक्‌षून आम्ही आमचा संसार व्‌यर्‌थ घालवीत आहोत। तर ज्ञानदेव म्हणतो, अीश्‌वरा ने च आम्हां ला आता रक्‌षावें!

३३

ज्यां नी आपलें जीवन च हरि-नामा वर रचिलें आहे, नाम हा ज्यां ना नित्‌य नेम झाला आहे, अशीं माणसें फार थोडीं। अुलट विकारा ने भरलेलीं, नाम-विहीन, मृत-प्‌राय जीवनें च पुष्‌कळशीं।

ज्ञानदेवा ने अेकदा निवृत्‌तिनाथां स विचारलें, "आकाश सर्‌वा हून व्‌यापक आहे। आकाशा हून काय व्‌यापक आहे?" निवृत्‌तिनाथ म्हणाले, "आकाशा हून नाम व्‌यापक आहे"।

३४

सर्‌व साधने चें आणि धर्‌माचरणा चें फलित अुच्‌च-नीच भाव जाअून सर्‌वांघटीं राम दिसू लागणें हें च आहे। तू निःशंक-पणे तें च धरून नामा चा ध्‌यास घे। जात, गोत, कुळ, अित्‌यादि सर्‌व भेद-भाव विसरून तीव्‌रते ने भक्‌ति-प्‌रेमा चा आश्‌रय कर म्हणजे अिथल्या अिथें च वैकुंठ निर्‌माण होअील।

३५

नाम-विमुखता हें च खरें पाप असून, तें धूअून काढण्या स कोणतीं हि तीर्‌थें अुपयोगी पडणार नाहीत। अुलट, नाम-स्‌मरण असेल तर केवढ्या हि मोठ्या पापा तून अुद्‌धार होअू शकतो, हें वाल्‌मीकि आदीं च्या अुदाहरणां वरून स्‌पष्‌ट झालें आहे। म्हणून ज्ञानदेव म्हणतो, तुम्ही

आसूथे ने नाम घेत जा। म्हणजे तुमचें पाप तर नाहीसें होओील च, पण तुमच्या मागे तुम्ही अेक विशुद्ध परंपरा निर्माण करून जाल।

३६

भक्ति-मार्गा चें थोडक्या त लक्षण, 'मुखीं नारायणा चें नाम आणि हातीं भूत-दये चें काम' असें करता येओील। भक्तां चें ज्ञान, ध्यान, जप, 'नारायण' या अेका शब्दा त येअून जातात। नारायण ही नर-समुदाया ची देवता आहे। म्हणून 'नारायण' हा भूतदये चा आणि समाज सेवे चा अुद्घोष आहे। संकुचित भावने ने संसारा त व्यक्ति-गत धनादि-संचय करण्या ची वृत्ति होत असते। परंतु नारायण-नाम, अर्थात् भूत-दया, हें च संसारा च्या गावा त अुपयोगी पडणारें सर्वोत्तम धन आहे, असें निवृत्तिनाथां चें सांगणें आहे। आणि ज्ञानदेवा ला हि तो च ध्यास लागलेला आहे।

३७

वेदां त अनेक मार्ग सांगितले आहेत। शास्त्रां त अनेक दुर्गम चर्चा केल्या आहेत। पुराणां त अनेक कथा भरल्या आहेत। त्या सर्वां चें नवनीत अीश्वर-दर्शन हें च आहे। अेक च परमेश्वर आत्म-रूपा ने नटला आहे। जीव हि तो च आहे, आणि शिव हि तो च आहे। तो च घनदाट सर्वत्र भरला आहे। अेवढें पाठ कर आणि बाकी सारें खुशाल विसरून जा।

३८

हरि म्हटलें की सर्व पापें क्षणा त हरलीं। हरि-नामा च्या मंत्रा पुढे भूत-बाधा टिकू च शकत नाही। कारण भौतिक सृष्टी ला

च आत्मिक स्वरूप देणारा तो मंत्र आहे । त्या चें सामर्थ्य अगाध आहे। त्या च्या खोली चें माप काढता न आल्या मुळे 'नेति नेति' म्हणून अुपनिषदां ना हि मौन पतकरावें लागलें आहे ।

३९

हरि सर्व-व्यापक आणि सर्व देहां त विराजमान आहे। पण तें माणसा च्या लक्षा त येत नाही। आणि तो आपल्या अेका देहा त च गुंतून बसतो। मग परमार्थ कडू वाटतो आणि स्वार्थ गोड वाटतो। तसें झालें म्हणजे परस्पर-विरोधी स्वार्थां चा झगडा लागून संसार अवघड होअून बसतो। जिह्वा-रूप धनुष्या ला हरि-नामा चा बाण लावून तन्मयते ने वेध घेतला म्हणजे तें व्यापक तत्त्व ह्स्त-गत होतें। अर्थात् ह्या ला धाडसी आणि सुसज्ज अशी प्रतिभा लागते। पण ती असली म्हणजे व्यापक बुद्धि लाभून प्रेम-रूप वैकुंठ अगदी जवळ म्हणजे ह्रदया त च दिसू लागतें। अशा प्रकारे सर्व झगड्यां चें आणि पापां चें छेदन हरि-नामा ने होत असतें। या चें ज्ञानी पुरुषां ना ज्ञान आहे, आणि ज्ञानदेवा ला ध्यान आहे।

४०

परम शांति पावलेल्या निवृत्ति गुरूं नी ज्ञानदेवा ला हरि-नामा चा मंत्र दिला। आणि सांगितलें कीं "अीश्वर-प्राप्ती च्या सर्व मार्गां त नाम-स्मरणा चा हा मार्ग अत्यंत सरळ आणि नेमका आहे । स्थिर-बुद्धि-रूप समाधि, कर्म-योगा ची साधना, दया-शांति आदि दैवी संपत्ती चे गुण, सर्वां भूतीं समत्व-रूप भक्ति, यम-दमादि योग, शेवटीं अज्ञाना चें निरसन करणारें ज्ञान-विज्ञान—

अेकूण सर्व साधन आणि सिद्धि, हरि-नामा त सामावली आहे ।
हरि-नाम ही नव-जीवन देणारी मधुर संजीवनी च आहे"।

४१

अेक हरी चें नाव घेतलें म्हणजे दुसरें नाव घ्यायला अुरत च नाही । हरि-नामा तली ही अद्वैता ची खुबी अेखादा च जाणतो । सम-बुद्धी ने हरि-नाम घ्यावें आणि सर्वत्र हरि समान भरलेला पहावा । मग तो हरि यम-दमां चा जणू वैरी च बनतो । कारण, 'यम म्हणे काय यमावें । दम म्हणे कवणाते दमावें' अशी स्थिति तो करून टाकतो । सूर्य सहस्र किरणां नी त्रि-भुवन व्यापतो । तसा आत्मा-राम सर्व देहां ना व्यापून आहे । ज्ञानदेवा ला हरि-पाठा च्या नियमा ने अेवढें दर्शन करवून दिलें । परिणाम हा झाला की त्या चे पुढ चे सर्व जन्म कापले गेले ।

४२

आता तुला सर्व जीवन-शास्त्र संक्षेपा ने सांगतो । पहिली गोष्ट म्हणजे अेक क्षण भर हि रिकामा राहू नको । संसारा ला भलते च महत्त्व देअू नको । नामा विषयीं संकल्प दृढ राख । अहंता आणि ममता सोड । अिंद्रियां चे लाड करू नको । तीर्थ-व्रतादि साधन-मार्गा विषयी आस्था बाळग । दया, क्षमा आणि शांति यांना विसरू नको । आला अतिथि हरि च समज ।

निवृत्तिदेवां ची ही शिकवण आहे । आणि ज्ञानदेवा ला ती प्रमाण आहे । सर्व शास्त्रां चें रहस्य आणि सर्व सुखा चें सार ती त साठवलें आहे । हरि-पाठा चे हे सहचारी भाव असल्या मुळे, तो समाधि-संजीवन च झाला आहे ।

४३

संतां च्या भेटी ने ज्ञानदेवा ला सुख, प्रेम, आनंद, हर्ष अितका वाटतो की त्या मुळे त्या चें मीपण च लया ला जातें। त्यां ना मिठी मारताना त्या ला दोन स्थूल बाहु अपुरे पडतात, आणि मदती ला हृदया तून जणू दोन सूक्ष्म बाहु आणिक निर्माण होतात ! अर्थात् संतां च्या भेटी ने जीवा चें जीवत्व लोपून त्या ला चतुर्भुज अीश्वरा ची पदवी जणू प्राप्त होत असते ! या हून अधिक थोरवी ती काय असू शकते ? पण ह्या त नवल काही च नाही। कारण, 'तुमच्या कृपा-कटाक्षा ने जीवा ला निज-पद लाभेल' असें देवा ने संतां ना वर-दान च देअून ठेवलें आहे।

४४

संतां ची भेट थोर पूर्व-पुण्या ने लाभत असते। त्यां च्या भेटी चा आनंद सामान्य नव्हे। कारण, भव-दुःख च त्या ने फिटत असतें। सर्व च नातीं संतां च्या ठिकाणीं अेकवटल्या सारखीं होतात। ते खऱ्या अर्था ने तीर्थ-रूप आहेत। कारण, सगुण परमेश्वर त्यां च्या ठिकाणीं प्रगट आहे। ज्ञानदेवाला संतां च्या भेटी चें सौख्य वर्णावया ला अुपमा अपुऱ्या पडतात।

४५

भगवद्-भक्त हे खरे झुंझार आहेत। त्यां च्या समोर दोषां चे समूह नागवे होअून पळतात। अर्थात् दोषां चें यथार्थ स्वरूप भक्तां समोर प्रगट होत असतें। त्यां च्या हृदया त अीश्वरा चें सतत चिंतन असल्या मुळे शांति आणि क्षमा त्यां ना नेहमी साथ देत असतात। हरि-नाम हें त्यां चें हत्यार। अीश्वरा चे अंकित होअून

त्या चें वैभव वाढविणें हा त्यां चा शृंगार। आणि वैराग्य हें त्यां चें बळ। त्या मुळे षड्-रिपूं चा त्यां च्या पुढे टिकाव च नाही। असे हे निश्चयी वीर अीश्वरा ला जिंकून घेतात यां त नवल कसले ?

४६

साखरे च्या गोडी ची पारख साखरे च्या रसिकां नी च करावयाची; तशी साधुत्वा ची कसोटी संतां शिवाय कोण करणार? कसोटी स अुतरलेल्या सत्पुरुषा च्या संगती ने च हरी ची लब्धि व्हावयाची। अितर हिणकसां च्या संगती त संसार वाढावयाचा। सत्-पुरुष सूर्य-बिंबा सारखे स्वयं-प्रकाशी आणि सोज्वळ, सर्वां ना प्रकाश देणारे पण सर्वां हून अुंच आणि वेगळे, निर्मळ आणि निर्लिप्त असतात्। निवृत्तिनाथां च्या संगती त ज्ञानदेवा ला हा अनुभव आला आहे।

४७

आम्ही निरंतर हिंडणारे यात्रेकरू आहोत। पापां ची आम्हां ला भीति नाही। अुलट पापें च आम्हां ला भीत असतात। आम्ही समते ची कावड वाहत असतो, जी नामामृता ने भरलेली असते। आम्हां ला अवांतर तपस्ये ची गरज नाही। कर्म करावें की करू नये, कोणतें करावें आणि कोणतें करू नये—हे प्रश्न आम्ही देवा वर सोपविले आहेत। त्या मुळे आमच्या दुःखा ची समाप्ति झाली आहे।

४८

संत-संगती ची अपेक्षा न ठेवतां स्वतंत्रपणे योगादि साधन करू जावें तर काही तरी वाकडें च पडतें। अुघड च आहे, भावा

शिवाय देव, गुरू शिवाय साक्षात्कार, तपा शिवाय देवते ची कृपा आणि प्रेमा शिवाय हिता ची गोष्ट कुठून लाभणार? म्हणून ज्ञानदेवा ने तर खूण-गाठ बांधून ठेवली आहे की सत्-संगती शिवाय तरणोपाय च नाहीं।

४९

लोक विचारतात, "भक्तां च्या संगती त कार्य-क्रम काय?" स्थूल कार्य-क्रमा साठी भक्तां च्या कडे जावयाचें नसतें। तेथला कार्य-क्रम मुख्यतः मानसिक असतो। त्यां ची स्थूल भासणारी क्रिया हि मानसिक अर्था ने भरलेली असते। ते नाम-स्मरण करताना दिसतील। पण नाम हें त्यां ना केवळ शब्द नाही। तो त्यां च्या जिवा चा भाव आहे। तें त्यां ना अेक तत्त्व आहे। किंबहुना तें त्यां चें अेक च अेक तत्त्व आहे। त्या नादा त त्यां ची सर्व साधना चाललेली असते।

योग्यां ना जीवना ची कला साधलेली असते। स्थूल कार्य-क्रम हि त्यां चा आखल्या सारखा दिसेल। भक्ता पाशी नामामृता ची गोडी असते। ती तून सर्व कार्य-क्रम आपोआप सुचतो। दोन्ही वस्तुतः अेक च आहेत। कारण, दोघां ना हि द्वैत माहीत च नाही। प्रह्लादा च्या ठिकाणीं नाम-स्मरणा चा अुत्कर्ष दिसतो, तर अुद्धवा ला योगेश्वर कृष्ण गुरु लाभला। त्या च्या कृपे ने तो योगी झाला। दोघां नी मुक्काम अेक च गाठला।

दोहों त फरक सांगायचा तर अितका च सांगता येअील की योगा चा मार्ग कठिण आहे, नाम-स्मरणा चा सुलभ आहे। पण तो स्वतः सुलभ असला तरी त्या चा जिव्हाळा वाटणारा मनुष्य दुर्लभ च आहे!

५०

ज्या ला साधु-मुखा ने बोध लाभला तो वेगळेपणा ने अुरत च नाही। विश्वा शी अेकरूपता अनुभवतो। पुढे अनुभवा पुरतें हि द्वैत न अुरून त्या चा तो अनुभव हि जिरून जातो। अग्नि कापरा ला जाळून टाकतो आणि मग आपण हि नाहीसा होतो। साधू चा सेवक मोक्षा ची पदवी मिळवितो, आणि मग ती हि पदवी सोडून हरि-भक्त होअून राहण्या चें भाग्य मिरवितो। ज्ञानदेवा ला अशा सज्जनां च्या संगती ची गोडी लागली। त्या मुळे त्या ला समाजा त, सृष्टी त, आणि स्वतः च्या हृदया त, हरि च हरि दिसतो।

५१

अनुभवी गुरू पासून ज्या ला शिक्षण मिळालें तो पूर्ण स्वावलंबी झाला। कारण, त्या च्या ज्ञाना त काही च शंका किंवा कचरटपणा अुरलेला नसतो। तो स्वतंत्र प्रज्ञे ने जी जी कल्पना करील ती जगा त सिद्ध व्हायला च पाहिजे। त्या च्या प्रतिभे त कशाची च वाण नाही। ज्ञानदेव म्हणतो, गुरु-कृपे ने मनुष्य अितका अुंच चढतो।

५२

अीश्वर करील तर काय होणार नाही? त्या च्या अिच्छे ने दगड नदी ला तरून जातील। मुंग्या सूर्य-किरणां वर चढतील। अग्नि-कुंडा त पिकें पिकतील। भिंती ला पाय फुटतील। मशक मेरू ची बरोबरी करतील।

अीश्वरा चें हें अघटित सामर्थ्य आपण कल्पू शकतो। गुरु-कृपे चें सामर्थ्य हि तसें च आहे। कारण, त्या ने तुच्छ मानलेला जीव हि पर-ब्रह्म-पदवी गाठू शकतो।

५३

चित्रा त ला सूर्य प्रकाश देऊं शकत नाही। वैराग्य-शून्य संन्यास किंवा अनुभव-शून्य ब्रह्म-ज्ञान यां ची ती च गत आहे। अनुभवी गुरू च्या मार्ग-दर्शना खाली ज्यां नी सांगोपांग साधना केली आहे, त्या भाग्यशाली पुरुषां ना च प्रखर-वैराग्य-युक्त संन्यास आणि अनुभवा चें ब्रह्म-ज्ञान लाभत असतें।

५४

अनुभवी सद्गुरु ज्या शिष्या ला लाभला, त्या ला तो सर्व संतां हून थोर आहे। कारण, बाकी चे संत मेघ-वृष्टी ने सर्व-सामान्य अुपदेश करणारे असतात। पण गुरु शिष्या ची भूमिका लक्षा त घेअून पहिल्या पासून अखेर पर्यंत त्या ला मार्ग-दर्शन करीत असतो। जणू काम-धेनु च त्या ची तो असतो।

प्राथमिक अवस्थें त तो त्या ला सुख, प्रेम आणि धैर्य देतो। पुढे त्या चें वैराग्य जागृत करून त्या च्या वासने च्या गाठी सोडवतो। मग त्या च्या डोळ्यां त ज्ञानांजन घालून त्या ला आत्म्या चें दर्शन घडवितो। शेवटीं त्या चा बोध स्थिर करून त्या च्या कडून धर्म-संस्थापने चें कार्य करवितो।

अशा समर्थ गुरु-रूप शिव-मूर्ती ने काया-रूप काशीक्षेत्रा त ज्ञानदेवा च्या काना त विश्वोद्धारा चा तारक मंत्र सांगितला। आणि बघता बघता ज्ञान देवा ची त्या विचारा त समाधि लागली!

५५

सद्-वृत्ति ही शिष्या ची योग्यता, आणि वृत्ति-रहितता हें गुरू चें लक्षण। अशा निवृत्ति-रूप गुरू च्या चरणीं शिष्या ची सर्व

तीर्थें, त्या ची सर्व साधना सामावलेली आहे। ज्ञानदेवा चा संकल्प आहे की त्या च अेका तीर्था त डुबकी मारायची, आणि अवांतर कोण च्या हि साधनां च्या जोजारा त चित्ता ला भ्रमू द्यायचे नाही।

या त्या च्या संकल्पा ने त्या च्या सर्व वृत्तीं चें परिमार्जन झालें। तो निवृत्ति-स्वरूप बनला। जणू प्रलय-काळ चा सर्वत्र पसरलेला अेक च समुद्र! साऱ्या लाटा लीन झालेल्या! तसा च त्या चा देह हि निवृत्ती त मिसळून गेला। देवा ने काय गंमत केली! मिथ्या संसारा ला तरून जाण्या साठी साधने चें मोठें जहाज सजविलें होतें, तें त्या मृगजळां त च हरवलें। अर्थात् संसारा चें मिथ्यात्व कळल्या नंतर साधना हि मिथ्या ठरून तिची गरज संपली।

५६

साधक भूत-दये मुळे कर्म-योगा त प्रवृत्त झालेला असतो। त्या ची सर्व प्रवृत्ति भूत-दये च्या प्रेरणे ने चाललेली असते। जस-जशी त्या ची भूत-दया व्यापक आणि खोल होत जाते, तसतसें अितर जीवां पासून त्या चें अंतर तुटत जातें। अखेरीस सारे जीव आणि मी अेक च, सर्वां चें सुख तें च माझें सुख, अशी प्रतीति येअून तो जणू सर्व भूतां चा जीव च बनतो। अेवढ्या अनुभूती नंतर सहज च स्थूल क्रिया लोपते, आणि काही न करून हि सर्व घडवून आणण्या ची शक्ति हाता त येते। हिला च अकर्मा त कर्म असें म्हणतात।

ही बीजरूप सिद्धि निवृत्तिनाथां ना साधल्या मुळे निजून च त्यां चें सारें काम होतें। अितर जीवां हून जो अलगपणा ने अुरला च नाही, तो भूत-दये ची हालचाल तरी काय करणार? भूतदया-रूप च तो झाला। मग पृथ्वी हें आंथरूण, आकाश पांघरूण आणि सर्व भूतां

च्या सुख-साम्या ची कल्पना-रूप झोप घेणें हा च त्या चा कर्म-योग झाला। तो सर्व भूतां च्या निज-स्वरूपां त निजला। म्हणून विषमते च्या सर्व कला सहज च लोपल्या। गुरु-शिष्य-भेद हि मावळला। अर्थात् ज्ञाना ची देवघेव हि थांबून केवळ आनंद च उरला।

आता नेहमी प्रमाणे भूत-दये ला क्रिये चें आलंबन नको। ज्ञाना ला शब्दा चें आलंबन नको। खाली ठाणवई आणि वर दिवा अशी गरज च नाही। खाली दिवा आणि वर हि दिवा! आलंबन-रहित दिवा च दिवा! कल्पिता आला तर कल्पून घ्या!

## प्रकरण दुसरें : भक्ति

५७

विठ्ठला च्या दर्शना ने डोळ्या ला किती सुख होत आहे ! पण त्या त नवल कांही च नाही। माधव आहे च तसा सुंदर ! सर्व सुखा चें आगर च आहे तो ! नवल हें च आहे की, सर्वां ना त्या च्या दर्शना ने असा आनंद होत नाही। पण या त हि नवल नाही। कारण, या आनंदा चें अधिष्ठान केवळ ती बाह्य मूर्ति नाही। हृदयां तील प्रेम आहे। ओश्वरा विषयी असें प्रेम अनेक जन्मां च्या पुण्याओी ने च लाभत असतें।

५८

ज्ञानदेव ओश्वरा च्या मूर्ती चें ध्यान करीत आहे। मूर्ती चें सौंदर्य तर मोहक च आहे। पण तें ओश्वरा च्या अनंत गुणां चें प्रतिबिंब मात्र आहे, छाया-स्वरूप आहे। म्हणून संकेत ओळखून सौंदर्य-द्वारा मंगल गुणां च्या चिंतना त चित्ता ला लावायचें असतें। तसे केल्या ने ओश्वरा विषयी प्रेम वाटून तो त्या च्या गुणां सकट हृदया त जडून जातो।

५९

हे जीव-भ्रमरा, तू रस सेविण्या साठी दुनिया भर भ्रमण करीत असतोस। रस-वृत्ति हा काही अवगुण म्हणता येणार नाही। पण बहिर्मुखता आणि चंचलता हे तुझे मोठे अवगुण म्हटले पाहिजेत। तू जर अंतर्मुख वृत्ती ने पाहशील तर सौंदर्या ची जणू

खाण, आणि ज्या तील सुगधा च्या अंश-मात्रा ने दुनिया भरून राहिली आहे, त्या हरिचरण-कमळा चें तुला दर्शन होईल। आणि मग, निश्चळपणे तेथील रस भोगीत रहा असें सांगण्या ची गरज च राहणार नाही !

६०

पांडुरंग-मूर्ती चें, ईश्वरा च्या साकार स्वरूपा चें, सौंदर्य वर्णन करण्या ला शब्द च नाहीत। निर्गुणा चें वर्णन 'अ-रूप' या शब्दा ने तरी करता येतें। हें तर स-रूप असून कोण्या हि रूपा शी त्या चें साम्य नाही। निर्गुण समजावयास कठिण मानलें जातें। पण तें तितकें कठिण नाही। कारण, तें उघड च निर्गुण आहे। पण हें सगुणा चें पांघरूण घेतलेलें, नाना नाटकें रचणारें, ह्या चा उलगडा सहसा होत च नाही। त्या साठी केलेल्या जिज्ञासे चें स्पष्ट उत्तर मिळत नाही। खुणे ने काय सूचित होईल तें खरें। पण त्या ची ओढ मात्र टळत नाही। निर्गुणा शी बोलण्या चा प्रश्न नाही। या च्या शी बोलायचें आहे पण तें शब्दा शिवाय। पाया पडायचें पण पाऊल दिसायचें नाही। दर्शन घ्यावयाचें, पण समोर की मागे कळावयाचें नाही।

अशा या अत्यंत गहन स्वरूपा चा छडा लावण्या चा ज्ञानदेवा ने प्रयत्न केला। तर अनुभवा ने निष्कर्ष निघाला की, तें रूप आपल्या हृदया त च स्वयंभू उभें आहे। आणि बाहेर दिसतें तें हि त्या च्या च पडताळ्या चें आहे। मग ह्या नवीन दृष्टी ने पाहू जाता सर्व च अंतरंग पालटून गेलें !

६१

श्री कृष्ण आपल्या सहज थाटा त कल्प-वृक्षा खाली वेणू वाजवीत अुभा आहे। ज्या ला जो ध्वनि अैकावया ची अिच्छा असेल तो त्या ने अैकून घ्यावा। ज्या ला जें रूप पाहण्या ची गोडी असेल, तें त्या ने पाहून घ्यावें। जग त्रिविध आहे, तर तो हि तसा च त्रिभंगी आहे। देहधारी भक्ता साठी तो देहधारी झाला आहे। गोविंद, गोपाळ अित्यादि जगा तलीं हजारों नावें त्या ने धारण केलीं आहेत। बाह्य आणि आंतरिक सारीं सुख-दुःखें पोटा त जिरवणारा तो परमानंद आहे। तो सर्व गुणां नी भरलेला, जीवन-स्वरूप, आनंद-मूर्ति, चिंतना च्या पलीकडे आहे। जड चेतन आणि शून्य तिन्ही व्यापून राहिलेला, तो भक्तां चा लाडका विठ्ठल आहे।

६२

गोवर्धन पर्वत अुचलण्या साठी सर्व गोपाळां नी सामुदायिक अुठावणी केली। कोणी आपल्या हातां चा आधार दिला, कोणी डोक्याचा टेका दिला, कोणी काठ्या लावल्या। कोणा चे हात मोडले, कोणा चीं मनगटें लचकलीं। शेवटीं तो पर्वत अुभा झाला।

गोपाळ आनंद-भरा त म्हणाले, "धन्य आम्ही, हा पर्वत अुचलला। सामुदायिक प्रयत्ना ने काय होणार नाही?" शाहणे म्हणाले, "अरे हा सारा कृष्णा चा महिमा। तो आपल्या त असून तुम्हा ला कसा दिसत नाही? आपण सारे च आता मरत होतो की! त्या च्या कृपे मुळे जिवंत राहिलो, हें च भाग्य समजा।"

६३

“ओीश्वर अेक च आहे, पण अुपासक त्याची बहुविध अुपासना करतात” असें श्रुति सांगते। अुपासकां च्या भक्ति-भावा मुळे त्यां ची ती अुपासना होते। पण ती च अज्ञान जनते च्या भ्रमा ला कारण झाली आहे।

ओीश्वर अ-व्यक्त अ-रूप। तेथे चित्र-कले चा काय प्रवेश? तरी पण काल्पनिक संकेत रचून चित्रकार आपापल्या हौशी प्रमाणे त्या चीं चित्रें, प्रतिमा अित्यादि बनवतात। आणि भक्त-जन तसल्या त्या अेकदेशी मूर्ती मध्यें सर्व-व्यापक निर्लिप्त परमेश्वरा चें भावन करू लागतात।

कोणी ध्यान-योगी ओीश्वरा ची ज्योतिर्मय ॐकार-स्वरूपा त अुपासना करतात। आणि अुपपत्ति सांगतात की, ओीश्वरा ला विश्व रचने चा छंद लागला, तेव्हा त्या तून ॐ हा नाद निघाला। तो च पुढं तीन कलां नी चिरला जाअून त्या तून तीन देव आणि तीन जगें निर्माण झालीं। ही सारी अुपपत्ति ध्याना ला आलंबन म्हणून गृहीत धरली तरी, ओीश्वर-स्वरूपा च्या ती अगदी च अलीकड ची आहे। वस्तुतः तर ती ओीश्वरा ला लागू हि व्हावयाची नाही। जो स्वयं-तृप्त नित्य-परिपूर्ण आनंद-स्वरूप, त्या च्या ठिकाणीं कुठला छंद, नि कुठला नाद, नि कुठलें काय?

कोणी धर्म-परायण ओीश्वरा ची अवतार-स्वरूपा त भक्ति करतात। म्हणतात, “ओीश्वर वेळोवेळीं अवतार घेतो। साधु-परित्राण करतो। धर्मा ची घडी बसवितो”। पण तो समष्टि-स्वरूप, त्या ला

ना आदि ना अंत; ना जन्म ना मृत्यु; केवल निर्विकार ! हें अवतार-कार्य त्या च्या ठिकाणीं कसें संभवेल ? हें सर्व घडत असतें ही गोष्ट खरी; पण तें माये चें लाघव आहे। त्या चा त्या ला काय स्पर्श ?

अीश्वरा ची निर्विकारता लक्षून कोणी त्या ला शालग्रामादि पाषाण-प्रतीकां त पूजतात। म्हणतात, 'माणसा च्या माना ने पाषाण कसा निर्विकार !' त्या ला ना राग ना द्वेष, ना लोभ ना मत्सर। पण कुठे पाषाण आणि कुठे परमेश्वर ? पृथिव्यादि पंच-भूतें प्रलयांतीं जेव्हा शून्या त विलीन होतात त्या हि वेळीं जो त्या शून्या हून वेगळा शिल्लक च राहतो, त्या परिशुद्ध निर्विकार-स्वरूपा ला कशा ची अुपमा द्यावयाची ?

तो तर अंतर्-बाह्य भरून राहिला आहे। अिंद्रिय-द्वारा त्या ची अुपासना खुशाल केली जावो, पण अिंद्रिय-द्वारा त्या चें दर्शन मात्र होणें नाही। तो क्षेत्र-क्षेत्रज्ञा हून वेगळा, क्षराक्षरातीत, सृष्टी च्या अुत्पत्ति-स्थिति-लयां चा जेथे लेश हि संपर्क नाही, असा पुरुषोत्तम, सर्वां च्या हृदया त विराजमान आहे। तेथे च त्या चें दर्शन घ्यावयास पाहिजे।

६४

अीश्वरा चें स्वरूप काय, किंवा त्या चा त्या च्या माये शी संबंध कोणत्या प्रकार चा, या प्रश्नां चा निर्णय करणें किंवा तो शब्दा त मांडणें अशक्य आहे। अीश्वरा चें माप करणें म्हणजे आकाशा ला गवसणी घालण्या सारखें च आहे। कोणत्या हि मापा त बसायला तो अति व्यापक पडतो। पण म्हणून त्या ला व्यापक

म्हणावें तर तें हि जमत नाही। कारण व्याप्य हि तो आहे। विरोधी विशेषणां पैकी कोणतें हि अेक च त्या च्या वर्णना ला अपुरें पडतें। म्हणून दोन्ही अेकत्र वापरावीं तर अर्थ निष्पत्ति च होत नाही। ओीश्वरा ची व्याख्या करण्या साठी जितकी जितकी बुद्धि दौडवावी तितका तितका तो अधिक च पुढे दौडतो। छाये च्या मागे धावण्या सारखा च प्रकार तो होतो।

बरें, ओीश्वरा ची माया तरी त्या च्या हून वेगळी करता येते का? द्रव्य आणि द्रव्या चे गुण, वस्तु आणि वस्तू चा आकार, कारण आणि कारणा चें कार्य अेकमेका पासून भिन्न आहेत की अभिन्न आहेत, की आणिक कशीं आहेत, या बाबती त दर्शनकारां चीं भांडणें कधी च तुटलीं नाहीत। वस्तुतः हीं भांडणें दर्शनकारां चीं नसून ओीश्वर आणि त्या ची माया यां च्या मधलीं आहेत। त्या दोघां ना अेकत्र राखावें, तरी तीं भांडतात आणि अलग करावें तर भांडतात च। अेवढ्या भांडणाऱ्या माय-बापां ची समजूत आम्ही लेकरें कशी घालणार? म्हणून ज्ञानदेव या भानगडी त न पडता माये चें नाव च सोडून ओीश्वर-चरणीं लीन होणें पतकरतो।

६५

ओीश्वर सर्वां चें उगम-स्थान, सर्व-साक्षी, सर्वां चें भरण करणारा, सर्व-मय आहे। आनंद आणि प्रबोध या तर त्याच्या मोठ्या दोन खुणा च आहेत। पण विटे वर अुभा ही एक तिसरी खूण आम्हा भक्तां ना लाभलेली आहे, जिचें ध्यान करून आम्ही आमच्या हृदय-रूप विटे वर त्या ला नित्य अुभा राखत असतो।

६६

'सत्यम् ज्ञानम् अनंतम्' असें ज्या निर्गुण निराकारा चें वर्णन केलें जातें, तो च आम्ही सगुण साकार रूपा ने डोळे भरून प्रत्यक्ष पहात असतो। पण त्या त पहाणारा कर्ता नाही आणि पाहणें क्रिया-पद नाही। अशा त्या ऑीश्वरा ला आम्ही बाहेर विटे वर अुभा करतो। आणि हृदया त अंतर्-ज्योति-रूपा ने अनुभवीत असतो।

६७

विश्व-रूपा ने नटलेला, विविध देह धारण करणारा, आणि सर्व जाणणारा, अेक सत्य-स्वरूप आत्माराम च आहे। देहा त असताना देह बाजू ला सारून विवेका ने त्या चें ग्रहण केलें पाहिजे। मग मी-तू हा विभाग सहज च लटका पडतो। वास्तविक सर्वां च्या हृदय-कमला त तो अेक च चित्-सूर्य अलिप्तपणे प्रकाशमान आहे। ध्यानादि साधने चे अनेक प्रयोग आपण करतो, पण आपण त्या सर्व प्रयोगां ना आधारभूत, त्या सर्वां ना प्रकाश देणारे, त्या सर्व प्रयोगां हून वेगळे च आहोत। माणसा च्या डोळयां त सहस्र भाव अुमटलेले असतात। ते सर्व अेका आत्म्या पासून च निघालेले आहेत। म्हणून डोळयां तील रूप किंवा 'अक्षि-पुरुष' ही अेक चैतन्या ची खूण च शास्त्रकारां नी सांगितली आहे।

६८

पदार्था चे वर्ग—भाव आणि अभाव। भावा चे वर्ग—सगुण आणि निर्गुण। सगुणा चे वर्ग—व्यक्त आणि अ-व्यक्त। व्यक्ता चे वर्ग—स्थूल आणि सूक्ष्म।

तर्क शास्त्र विचारतें: 'ओीश्वरा ला तुम्ही कोणत्या कोटी त घालाल ?"

श्रुति म्हणते : "कोणत्या च कोटी त घालणार नाही"। भक्त म्हणतात : "दोन्ही कोटी त घालू"। ज्ञानदेव म्हणतो: "कोटी च नाहीत आणि ओीश्वर आहे, म्हणून तर्का चें काम च नाही"।

६९

बीज आधी की फळ आधी ? जगा ची रचना कशी झाली आहे ? कार्य-कारणां चा संबंध कशा प्रकार चा ? अशा सारख्या प्रश्नां ची चर्चा करण्या ची पुष्कळां ना हौस असते। वस्तुतः हे प्रश्न कधी सुटायचे हि नसतात, आणि त्यां चा आध्यात्मिक जीवना शी काही संबंध हि नाही। आध्यात्मिक सिद्धान्त प्रत्यक्ष अनुभवा वर अुभे असतात। "आत्मा अंतर्-बाह्य सर्वत्र भरलेला आहे" या अनुभवा ची आध्यात्मिक दृष्ट्या मुख्य गरज आहे। त्या त सर्व सिद्धान्तां चा सहज च समन्वय होतो।

७०

कर्म-योगी कर्मा ने ओीश्वरा ची सेवा करण्या चा हव्यास धरतो। ज्ञान-योगी बुद्धी ने ओीश्वरा चें स्वरूप जाणण्या ची हिंमत करतो। भक्त वाणी ने ओीश्वरा चे गुण गाण्या ची हौस बाळगतो। वस्तुतः न करण्या ने त्या ची सेवा होते। नेणिवे ने त्या चें स्वरूप जाणलें जातें। आणि मौना ने च त्या ची योग्य स्तुति होते। असें त्या चें स्वयंभू स्वतः सिद्ध स्वरूप आहे। अशा स्थिती त ज्ञानदेवा च्या लक्षा त च येत नाही की अेवढी विपरीत अभिलाषा साधक का धरतात ? आणि ओीश्वर त्यां ना का धरायला लावतो ?

७१

चित्ता तून अवांतर सर्व ज्ञानें काढून टाकून अेका ओीश्वरा ला च ओोळख। गुरू पाशी त्या ची विद्या शिकून घे, मना ने त्या चें मनन कर, बुद्धी ने त्या चा निश्चय कर। भक्ति-प्रेम वेगळें आणि ज्ञान वेगळें असें आपण म्हणतो। हें अितर विषया त बरोबर असलें तरी ओीश्वरा ला लागू नाही। कारण, ओीश्वरा ला जाणणारा त्या च्या वर प्रेम केल्या शिवाय राहू च शकत नाही। म्हणून ज्ञानदेव निकरा ने सांगत आहे, अेक ओीश्वरा ला जाणून घे, म्हणजे सर्व काही त्या त आलें।

७२

दिवे, तारका आणि चंद्र, सगळे मिळून दिवस करू शकत नाहीत। दिवस सूर्या ने च अुगवायचा। अितर साधनें आणि ओीश्वर-भक्ति यां ची ही तुलना आहे। अितर साधनें संसारा तल्या संसारा त काय प्रकाश पाडतील तो खरा। पण संसार च छेदून टाकणारा प्रकाश त्यां नी मिळावया चा नाही। आतल्या आत भटकायचें असल्यास रस्ते अनेक आहेत। बाहेर पडायला रस्ता अेक आहे। केवळ श्रवण-व्याख्यानादि ज्ञान-मार्ग प्राण-हीन ठरतो। केवळ कर्में करायला लावणारा कर्म-मार्ग दृष्टि-हीन ठरतो। म्हणून आत्म-निग्रहा चा योग-मार्ग स्वीकारावा तर तो हि ओीश्वर-भक्ती च्या अभावीं सिद्धी कडे नेणारा अपाय होअून असतो।

मी अुत्तम आणि दुसरे हीन हा अुच्च-नीच भाव, किंवा अमके माझे बाकी चे परके हा भेद-भाव, नाहीसा होणें ही सर्व साधनां ची कसोटी आहे। सर्वत्र ओीश्वर पाहणारी भक्ति च

तेवढी या कसोटी वर अुतरू शकते। अितर साधनां नी हे अनिष्ट भाव न वाटले तर मेहरबानी, असें म्हणण्या सारखी स्थिति आहे। म्हणून सर्व भेदाभेद सोडून विश्वात्मैक्य-रूप भक्ती चा आश्रय करू या। अशी बुद्धि निवृत्ति मुनी च्या प्रसादा ने ज्ञानदेवा स लाभली आहे।

७३

अकार, अुकार, मकार असला विश्लेषणात्मक तात्विक विचार किती हि केला तरी त्या ने अीश्वर कसा कळणार? कारण, तो संश्लेषण-स्वरूप आहे। तीन मात्रां चा ॐकार बनला। पण तो त्या तीन मात्रां च्या बेरजे च्या हि पलीकडे अर्ध्या मात्रे वर आहे म्हणतात। आणि ही अर्धी मात्रा गणिता त अर्धी असली तरी वस्तु-स्थिती त अपार आहे।

तुकड्यां च्या बेरजे तून पूर्ण निर्माण होअू शकत नाही। आधी तुकडे करायचे मग बेरीज करायची, ही तार्किक प्रक्रिया पूर्णा चें आकलन करण्या ला निरुपयोगी आहे। अीश्वर तर पूर्णा च्या हि पलीकडे केवळ अपरंपार आहे। त्या चें आकलन प्रेमा शिवाय होणारें नाही। अीश्वर आहे ज्ञान-मय, पण तो लाभत असतो प्रेमा ने। ही त्या ची खुबी अनुभवी पुरुषा च्या लक्षा त आली आहे।

७४

भजन म्हणजे सर्व देहीं भजन, म्हणजे च अीश्वर-भावने ने भूत-सेवा, या सारखें कलि-युगा त दुसरें साधन नाही। निरनिराळ्या गटां चे झगडे किंवा कलह हें कलि-युगा चें स्वरूप आहे। कलि शब्दा चा अर्थ च तो आहे। म्हणून सर्वोदया साठी झटणारें हें भजन हा च त्या वर तोडगा आहे। परस्परां चीं वास्तविक हितें

परस्परां च्या विरुद्ध नसतात, हें निज-ज्ञान त्या चा पाया आहे। त्या ने मुक्ती चा मारग् सहज च मोकळा होणारा आहे। मग संकुचित मीपणा लोपेल। परस्पर सद्-भाव जागृत होईल। सरवत्र सुख अुचंबळेल। ज्ञानदेवा ला निवृत्ति-चरण-प्रसादा ने लाभलेलें हें खुणे चें भजन आहे। त्या त च त्या ला सदा आनंद वाटत असतो। कुणा ला वाटणार नाही ?

७५

वस्तुतः मुळा त निरगुण स्वरूपा च्या प्रकाशना साठी हें सगुण विश्व-रूप धारण केलें आहे। पण परिणाम विपरीत झाला। लोक-दृष्टी त सगुणा ने निरगुण झाकून च टाकलें। अुलट विचारकां च्या विचार-दृष्टी त द्रष्ट्या ची—निरगुणा ची—दीप्ति अितकी फाकते की दृश्या चा—सगुणा चा—लोप होतो।

सरव-सामान्य लोक-दृष्टि आणि विचारकां ची विचार-दृष्टि या हून वेगळी भक्ती ची दृष्टि आहे। तिने व्युत्थान आणि समाधि दोहों ची कसर काढून टाकणारी समरस अवस्था लाभते। या समरसा त दृश्या चा लोप न होता द्रष्ट्या चें तेज भासमान होतें। त्या अवस्थे त अीश्वर चैतन्य-स्वरूपा त—सगुणा त—नांदतो। तरी चैतन्या पलीकडील तत्-स्वरूप निरगुण भासत च राहतें। शब्द बोलावा तर तदाकारता लोपते, आणि तदाकार व्हावें तर शब्द मावळतो, ही नेहमी ची अडचण। पण समरस अवस्थे त अिकडे ॐकार अुच्चारावा आणि तिकडे तदाकार हि व्हावें।

या अवस्थे चें थोडक्या त वरणन ‘प्रेम-कलिके मध्ये ओतलेलें प्रखर तेज’ असें करता येअील।

(१) सगुणा ने निर्गुण प्रगट व्हावें।

(२) दृश्य न लोपता द्रष्ट्या चें तेज फाकावें।

(३) चैतन्या च्या खेळा त—कर्म-योगा त—वागत असताना पलीकडील शांति अनुभवावी।

(४) शब्द बोलत असताना निःशब्दा त लीन असावें।

(५) प्रेमा ची कोमलता आणि ज्ञाना ची प्रखरता यां चा योग साधावा।

असें या अवस्थे चें विवरण होईल। या अवस्थे त तू नित्य विराजमान हो, असें ज्ञानदेवा चे गुरु ज्ञानदेवा ला सांगत आहेत।

७६

सर्वत्र सुख-साम्य योजिल्या शिवाय 'हरी ची समाधि' लाभणार नाही। भेद-भावा चें निर्दलन करून सुख-साम्य संपादण्या त च बुद्धी चें वैभव आहे। पण दुर्दैवा ने अवांतर ऋद्धि सिद्धि आणि निधि मिळविण्या त मनुष्या ला बुद्धी चें वैभव वाटतें। पण जो पर्यंत त्या सुख-साम्य-रूप परमानंदा कडे मन नाही तो पर्यंत या सर्व अुपाधि च होत। ज्ञानदेवा ला तर त्या च अेका ध्येया चें, त्या हरि-मय समाधी चें, चिंतन करण्या त त्या साठी तळमळण्या त रम्य समाधान लाभलें आहे।

७७

सेवका ने कष्ट सोसून सेवा केली, त्या मुळे स्वामी च्या हृदया चा तो स्वामी झाला। अर्थात् त्या चें पूर्वी चें सेवकपण गेलें आणि त्या ला स्वामी ची पदवी आली। तरी तो स्वामी ला विसरला नाही च। त्या ने आपला सेवकपणा च कायम राखला।

स्वामीं नी अुदारपणे सेवका ला स्वामी ची पदवी द्यावी। सेवका ने नम्रपणे आपली सेवका ची पदवी सोडू नये। या त च गोडी भरलेली आहे।

७८

कृष्ण-अवतारा तलें तें मधुर चित्र अजून भक्तां च्या चित्ता त सारखें खेळत असतें। वर मेघ गर्जून राहिला आहे। खाली मेघ-श्याम हरि वेणु वाजवीत आहे। ब्रह्म-विद्ये चें शिखर गाठून सामान्य गोवाऱ्या प्रमाणे गाअी राखीत आहे। तें दृश्य सनकादिकां च्या हि कल्पने बाहेर चें आहे। ब्रह्म-साक्षात्कार झाला आणि कर्में गळून पडलीं, हा त्यां चा अनुभव। या ने तर ब्रह्मा त कर्म मिसळून दिलें! निवृत्ति-दासा वर याची च कृपा असून भक्तां ना त्या चें अभय-वचन आहे, की तुम्ही निरंतर कर्में करून हि माझ्या भक्ती नें मोक्ष गाठू शकता। तुम्हा ला भिण्याचें काही कारण नाही।

७९

कृष्णावतारीं ज्या च्या सांनिध्या स्तव अेका आकाशा ला दुसऱ्या आकाशा चा हेवा वाटत होता, आणि ज्या च्या स्पर्शा साठीं यमुने चें पाणी वर चढत होतें, तो सर्व जगा चे डोळे आपल्या कडे ओढून घेणारा आणि मना ची गति कुंठित करणारा प्रभु, आज आमच्या साठी कमरे वर हात ठेवून भीमा नदी च्या किनाऱ्या वर अुभा आहे!

संसार-नदी भयानक दिसते, पण फारशी खोल नाही। कमरे अितकें च पाणी ती त आहे, असें तो संकेता ने सांगत आहे। त्या ची ती सम-चरण मूर्ति सर्वां ना समत्वाचरणा चा बोध देत आहे।

वास्तविक ती मूर्ति आहे आमच्या हृदया तली, पण बाहेर चें सोंग घेऊन अुभी आहे।

चित्ता चा पालट केव्हा होणार? ती मूर्ति हृदया त केव्हा प्रगटणार? आणि तिचा शब्द आतून स्पष्टपणे केव्हा अैकू येणार? ज्ञानदेवा ला ही च अेक तळमळ लागून राहिली आहे। अजून जीव अुरला आहे, म्हणून या तळमळी मुळे बाहेर निघू पाहतो आहे। निघून च गेल्या नंतर काय होओील कोणास ठाअूक!

८०

ज्ञानदेव देवा ला म्हणतो—"देवा, मी अेक सामान्य पतित जीव आहे ही गोष्ट खरी, परंतु तुझा मुद्रांकित भक्त आहे। झेंड्या चें फडकें तें काय, पण त्या च्या प्रतिष्ठे साठी राजा ला कष्ट करावे लागतात। राजा च्या सही चें चिटोरें तें केवढें, पण राजा च्या स्वतः च्या किंमती अितकी त्या ची किंमत ठरते। ती च स्थिति माझी आहे। मी तुझें यश फडकविणारा झेंडा आहे। मी तुझी आज्ञा जाहीर करणारें तुझें आज्ञा-पत्र आहे। त्या ची प्रतिष्ठा संभाळणें तुला भाग आहे"।

८१

भ्रमर फुलां कडे ओढला जातो, किंवा तान्हेला पाण्या चा ध्यास घेतो, तसें अीश्वरा चें आकर्षण वाटलें पाहिजे। गोडी लागण्या ची च मुख्य अडचण आहे। अेकदा लागली म्हणजे ती सुटायची च नाही। मग त्या अेका च गोडी त बाकी च्या सर्व गोडी लया ला जातील। किंबहुना त्या अेकी ने साऱ्या च गोड होतील।

८२

तीर्थें, तपें आणि त्याग करून हि तारण नाही। तारण आहे

लीनते ने। जेव्हा विठोबा च्या पायां खालची मी वीट होओीन, केवळ शून्य बनून जाओीन, तेव्हा च माझी साधना सफल झाली असें मी मानीन। अनेक पुण्यां च्या परिणामीं ओीश्वरा विषयीं भक्ति वाटू लागली आहे। पण भक्ती ची हि परिणति संपूर्ण निरहंकृती त झाली पाहिजे।

८३

ज्ञानी पुरुषा च्या आत्म-सुखा च्या नुसत्या गोष्टी आम्ही किती दिवस करीत रहावयाच्या? आम्हा ला त्या चा प्रत्यक्ष अनुभव व्हावयास नको का? पण त्या साठी अनिष्ट संस्कारां पासून मना चें संगोपन करावें लागेल। विशिष्ट भाव च मनांत स्थिर होओील असें करावें लागेल। आणि जमत नाही तें हें च। पण ओीश्वरा विषयीं भक्ति असली तर हें हि अवघड नाही। म्हणून ज्ञानदेव म्हणतो, "देवा, तू मला पुरेसा आहेस। तुझ्या प्रेम-सुखा त माझीं सर्व सुखें मुरतील असें कर, म्हणजे माझें बाकी चें कार्य सहज च होओून जाओील"।

८४

फाटकी घोंगडी मी कसा तरी वापरतो आहे। आणि धड केव्हां मिळेल अशी आशा राखून आहे। जी आहे ती वापरल्या शिवाय सुटका च नाही। पण अिकडे अुघड्या पाठी ला हीव तर वाजते च आहे। गाठी पैसा नाही। आणि प्राण-शक्ति आटत चालली। म्हणून आपल्या कमाओी ची आशा सोडून मी आता त्या च्या पाशी च मागतो। तो च मला धड देओू शकेल।

साधका ला स्व-बुद्धी प्रमाणे साधन आचरल्या शिवाय गत्यंतर नाही। पण शेवटीं ओीश्वर-शरणते शिवाय साधने ची पूर्णता होण्याचा संभव नाही।

८५

अीश्वर सच्चिदानंद-स्वरूप; आम्ही ताप-त्रय-मग्न। अीश्वर शुद्ध सत्व-गुणी; आम्ही त्रिगुणां ची मिसळ। अीश्वर सर्व-गुण-मंडित; आम्ही सर्व-दोष-संपन्न। अीश्वर अखंड; आम्ही फाटके। हा असा भेद कां? हा संदेह काही केल्या चित्ता तून जाअीना। अेकदा अेक योगी ध्यान करताना पाहिला, अेकदा अेक भक्त नाम गाताना पाहिला, आणि माझा संदेह सहज च जिरून गेला। लक्षा त आलें की साधने चें आणि भक्ती चें सुख अनुभविण्या साठी हा भेद आहे। तेव्हा पासून त्या च्या चरणीं माझी वृत्ति लीन झाली।

८६

तू माझा स्वामी आहेस आणि मी तुझा सेवक आहे, या त काही शंका नाही। पण विचार करता हा भेद टिकत नाही। म्हणून तो आता जाअू दे आणि अेक च रूप आपण दोघे हि धरू या। अेवढा अभेदा चा अनुभव मला येअू दे। मग मी तुमचा कायम चा दास होअून राहीन।

८७

अीश्वरा च्या भक्ता ला बाजारा त किंमत नाही। कारण, बाजारा ला च त्या च्या पाशी किंमत नाही। त्या ला अेक अीश्वर च पाहिजे। अीश्वर असल्या वर त्या ला काही लागत नाही। आणि नसल्यावर दुसरें काही चालत नाही। मिळून दोन्ही बाजूं नी त्या ला जगा च्या बाजारा त किंमत अुरली नाही।

८८

साधका च्या जीवना त अशी अेक अवस्था येते की ज्या वेळी त्या ला अीश्वरा चा तीव्र वियोग वाटू लागतो। त्या चें जगा च्या भाषे त वर्णन करणें अशक्य च असतें। तथापि मानवा च्या संतोषा साठी काही तरी भाषा वापरावयाची, म्हणून विरहासक्ती च्या भाषे त तो अनुभव मांडला जातो। त्या अवस्थे त भक्ता ला जगा तील सर्व शीतलता तापदायी होते। माधुर्य कडू लागतें।

ज्ञानदेव आपला अनुभव सांगतो—देहाकडे पहावें तर कधी काही च दिसत नाही। कधी भलतें च दिसतें। आणि कधी देहा च्या जागीं देवा चें च रूप दिसूं लागतें। कधी शून्यता, कधी भ्रांति, कधी अुत्कंठा अशी ही विचित्र दशा आहे।

८९

देवा, तुझा वियोग आता मला असह्य आहे। कारण, तुझी अर्धवट आशा लागल्या पासून वृत्ती च्या ओढाताणी ला सीमा च राहिली नाही।

कधी वृत्ती अितकी जड बनते कीं दिवस आणि रात्र मिळून अेक मोठी रात्र च होअून जाते। प्रतिभा वर अुठत च नाही। कधी वृत्ति अितकी चंचल बनते, की दिवस आणि रात्र मिळून अेक लांब च लांब दिवस बनतो। कल्पने च्या भरारी ला शांति च मिळत नाही।

तुझें प्रत्यक्ष दर्शन घडून तुझ्या स्फूर्ती चा आणि गंभीरते चा मला साक्षात्कार होअील तर च धडगत आहे।

९०

अीश्वरा च्या भेटी च्या अुत्कंठे ने मी कधी तर माणसा तून अुठतो, आणि पाखरा त जाअून बसतो। मी त्यां ना म्हणतो, "तुम्ही पृथ्वी सोडून आकाशा त अुडणारे आहात, तुम्हा ला अीश्वरा चें दर्शन असलें पाहिजे। माझ्या घरीं पंढरी चे पाहुणे केव्हा येतील, मला सांगा। तुम्हा ला काय हवें तें मी देअीन"। ते म्हणतात, "तुझें काही आम्हा ला नको, पंढरी चे राणे तुला अवश्य भेटतील। केव्हा भेटतील, तुझ्या हृदया त च कळेल मग"।

९१

अीश्वरा चें अेका क्षणा त विजे सारखें दर्शन होतें, आणि तसें च तें लोपतें। मग दीर्घ काल पर्यंत पुन्हा होत च नाही। त्या दर्शना चें स्मरण आणि त्या ची तळमळ मात्र लागून राहते। ज्या ला त्या ला विचारावें, तो केव्हां भेटेल। पण सांगतो कोण? शेवटीं अति च हाल झाल्या नंतर पुनः अेकदा भेट होते। तर मन मावळतें, वाणी खुंटते, आणि देह-भावने सकट चैतन्य जणू चोरी ला जातें। अर्थात् अनुभवा ला हि अवकाश अुरत नाही। पुनः थोड्या वेळा ने पूर्वीं ची च दशा।

९२

गवळण डोक्या वर दह्या चें मडकें घेअून बाजारा ला निघाली। 'दही घ्या जी दही' म्हणण्या च्या अैवजीं म्हणते 'देव घ्या जी देव'। बाया तिला विचारतात, 'तू दही विकतेस की देव विकतेस'? ती म्हणते, 'माझ्या भाषे त देव आणि दही अेक च आहे'।

